# THE NEW SAMHITA

OR

## SACRED LAWS OF THE ARYANS

OF THE

NEW DISPENSATION.

# नव संहिता

अथवा

## आर्य लोकांचें नियमशास्त्र.

ब्रह्मानंद केशवचंद्र सेन

यांच्या मूळ इंग्रेजी ग्रंथावरून

बळवंतराव भाऊ नगरकर

यांनीं मराठींत केलें.

किंमत रु० १॥.

भक्तिभाजन,

# श्री. शहाजी प्रतापसिंह महाराज

यांची

सनातन ब्राह्मधर्मावरील

अचल निष्ठा पाहून

त्यांस

भाषांतर कर्त्यानें

हा ग्रंथ

परम आदरानें

अर्पण केला आहे.

# प्रस्तावना.

नवसंहिता हा ग्रंथ ब्रह्मानंद बाबु केशवचंद्र सेन यांनीं मूळ इंग्रेजींत लिहिला. सर्व आर्य ह्मणविणाऱ्या लोकांनीं—आणि विशेषतः ब्राह्मधर्मानुयायी जनांनीं —संसारांत नेहमीं कसें वागावें व आपलीं नित्याचीं व नैमित्तिक कृत्यें कशीं करावीं, हें या ग्रंथांत उत्कृष्ट रीतीनें सांगितलें आहे. एकेश्वरवादी गृहस्थांस तर हा ग्रंथ अत्यावश्यक आहेच. परंतु इतर सर्वांनींही याचें वाचन व मनन आवश्यक करावें. प्रधानाचार्य केशव यांनीं केलेल्या या अत्युत्तम ग्रंथाचा लाभ आमच्या महाष्ट्रवासी धर्मजिज्ञासु बंधूंस मिळावा ह्मणून मूळ इंग्रेजीवरून हें मराठी भाषांतर केलें आहे. मूळ ग्रंथांत केशवचें चरित्र दिलेलें नाहीं. तें आह्मीं संक्षेपानें व साचित्र दिलें आहे. भाषांतर शब्दशः केलेलें नाहीं. तें सुबोध करण्याकडे फार लक्ष्य दिलें आहे. या ग्रंथापासून कोणास यत्किंचित जरी उपयोग झाला तरी माझे परिश्रम सफल झाले असें मी मानीन.

मुंबई.
एप्रिल—१८८८

ब० भा० नगरकर.

# विषयानुक्रम.

# ब्रह्मानंद केशवचंद्र सेन.

यांचें

## त्रोटक चरित्र.

परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृतां ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे ॥

पृथ्वीवर पाप प्रबल होऊन सत्याचा लोप होऊं लागला; दुर्जन उन्मत्त होऊन सज्जनांचा छल करूं लागले; धर्म पदभ्रष्ट होऊन अधर्माचें राज्य होऊं लागलें ह्मणजे धर्माची संस्थापना करण्याकरितां साक्षात् परमेश्वर महान प्रतापी असे सत्वशील पुरुष उत्पन्न करून आपलें सांम्राज्य स्थापन करितो, असें जें एका महा पुरुषानें ह्मटलें आहे तें सत्य आहे. बुद्ध, ख्रिस्त, महंमद, झरतुस्त, नानक, कबीर, चैतन्य

**तुकाराम** यांसारखे जे महापुरुष पृथ्वीतलावर निरनिराळ्या कालीं उत्पन्न झाले ते एवढ्याच करितां. याच मालिकेंतील एक सत्पुरुष अगदीं अलीकडे **बंगाल** प्रांतीं होऊन गेला. त्याचें चरित्र अत्यंत पवित्र व पुण्यशील आहे. तें या ठिकाणीं संक्षेपानें सांगतों.

**बंगाल** प्रांतीं **कलकत्ता** शहराच्या जवळ **हुबळी** नदीच्या कांठीं **गरीफा** अथवा **गौरीपूर** नांवाचें लहानसें खेडें आहे. त्यामध्यें बऱ्याच वर्षांपूर्वीं **गोकुलचंद्र** नांवाचा एक गृहस्थ राहात असे. तो फार गरीब असून त्याचें कुटुंब बरेंच मोठें होतें. त्यास **मदन**, **रामकमल**, आणि **रामधन** असे तीन पुत्र होते. यांपैकीं मधला, ह्मणजे **रामकमल**, हा मोठा बुद्धिमान होता. त्यानें केवळ बुद्धिप्रभावाच्या बळावर आपल्या कुलास दारिद्र्याच्या अति दुर्बल अवस्थेंतून काढून वैभवाच्या अति उंच पदवीस चढविलें. लहानपणीं थोडी बहुत विद्या संपादन केल्यावर **रामकमल** हा **कलकत्याच्या एशिआटिक सोसैटीच्या** छापखान्यांत खिळे जुळण्याच्या चाकरीस राहिला. तेव्हां त्याला दरमहा सारे आठ रुपये मिळत असत. हें काम करीत असतां **राम**नें दिवसास छापखान्यांत व रात्रौ आपल्या घरीं ज्ञानप्राप्तीचें काम मोठ्या झपाट्यानें चालविलें.

त्यामुळें त्याची बढती होत होत तो त्याच **एशिआटिक सोसैटी**चा सेक्रेटरी ह्मणजे मुख्य मंत्री झाला. त्याची बुद्धि अति तीव्र होती व तो मोठा सत्वस्त आणि प्रामाणिक होता. यामुळें पुढें अल्प कालानें त्यास **कलकत्त्या**च्या टांकसाळेच्या मुख्य अधिकाऱ्याची जागा मिळाली. हें काम मोठ्या जोखमीचें व हा अधिकार मोठ्या मानाचा असे. परंतु **राम**चें वैभव एवढ्याच मजलेवर येऊन थांबलें नाहीं. कांहीं वर्षांनीं **रामकमल**ला **बंगाल ब्यांके**च्या दिवाणाचा अधिकार प्राप्त झाला! या जागेचा दरमहा पगार रु० २००० असे! पहा, आठ रुपये महिन्याचा यःकश्चित कंपाजिटर कोठें, आणि मुख्य राजधानीच्या ब्यांकेचा दिवाण कोठें!! खरेंच, वैभवाचें चरित्र फार विचित्र होय, यांत संशय नाहीं! हा भाग्यशाली पुरुष या त्रोटक चरित्रनायकाचा आजा. **साधु केशवचंद्र** हे **रामकमल** यांचे नातु होत.

**रामकमल** यांस तीन चार मुलें होतीं. त्यांपैकीं दुसरा मुलगा **पिअरी मोहन** हा फार साधा, सात्विक, आणि सत्वशील असे. तो तारुण्याच्या भरांत असतांच मृत्यु पावला. यामुळें त्याच्या स्वभावाविषयीं व कर्तृत्वाविषयीं फारसें सांगतां येत नाहीं. हे **पिअरी मोहन, केशवचंद्र**

यांचे वडील होत. **पिअरी मोहन** हे आपल्या पित्याच्या, ह्मणजे वर सांगितलेल्या प्रतापशाली **दिवाण रामकमल** यांच्या मृत्यूनंतर इ० स० १८४८ या सालीं निवर्तले. त्या वेळीं त्यांचें वय **१२** वर्षांचें होतें. **पिअरी मोहन** मोठे भक्तिमान वैष्णव होते.

**साधु केशव** यांचा जन्म **कलकत्ता** शहरांत इ० स० १८३८ **या** सालीं **नोव्हेंबर** महिन्याच्या १९ व्या तारखेस झाला. **बंगाल** प्रांताच्या इतिहासांत **सेन** नांवाचे राजे होऊन गेले आहेत. त्यांच्याच वंशांत **केशवचंद्र** यांचा जन्म झाला. **केशवच्या** पणजापासून त्यांचें मूळचें राहाण्याचें गांव **गरीफा** होतें. परंतु **दिवाण रामकमलच्या** कारकिर्दीपासून कामाच्या संबंधानें त्यांच्या कुटुंबास **कलकत्यांतच** राहावें लागे. यामुळें **केशवचा** जन्म मुख्य राजधानीच्या ठिकाणीं झाला. **केशवच्या** मातोश्रीचें नांव **शरोदा सुंदरी.** ही साधुमाता साध्वि अद्यापि जीवंत आहे. हिच्या वयास साठ वर्षें उलटून गेलीं आहेत; अगदीं बालपणापासून नानाप्रकारचीं दुःखें सहन करावीं लागल्याच्या योगें तिचें अंतःकरण होरपळून गेलें आहे व सांप्रत तिचा अगदीं वृद्धापकाल झाला आहे, तरी तिच्या मुखावरील भक्तिभावाचें अलौकिक तेज अद्यापि कायम

आहे. लहानपणापासून ही स्त्री मोठी भाविक, भक्तिमान व धर्मशील आहे. पुत्राच्या सहवासानें तिच्या मनावर ब्राह्मधर्माचा संस्कार होऊन तिची नवविधानधर्मावर पूर्ण श्रद्धा बसली आहे, तरी पुरातन हिंदु स्त्रियांच्या आंगीं जे कांहीं अप्रतिम गुण असत ते सर्व शारोदा सुंदरीच्या ठायीं कायम आहेत. ती भर पंचविशींत असतां तिचा पति मरण पावला ! अशा भर तारुण्यावस्थेंत दुर्धर वैधव्यदशा प्राप्त झाली असतां ईश्वरेच्छा प्रमाण मानून आपलें शेष आयुष्य धर्माचरणांत खर्च करावयाचें असा तिनें निश्चय केला ! तिनें सर्व यात्रा केल्या आहेत व यच्चयावत् पुण्यक्षेत्रांचें दर्शन घेतलें आहे. उपवास करणें, व्रतें व नियम पाळणें या कामीं तिच्यासारखी कंटक स्त्री दुसरी कोणीही नसेल. हा विलक्षण धर्मस्वभाव आणि ही अलौकिक तापसी वृत्ति हीं दोन्हींही पुढें केशवचंद्र यांच्या ठायीं आलीं !

पिअरी मोहन वारले तेव्हां त्यांचा पुत्र केशव दहा वर्षांचा होता. केशवला एक वडील व एक धाकटा असे दोन बंधु होते. हे तिन्ही पुत्र अगदीं लहान असतां पति गत झाला तेव्हां शारोदा सुंदरीच्या दुःखास पारच नाहींसा झाला ! तशांत ती मधल्या बंधूची पत्नि ! जावा

नणंदांचा नेहमीं जाच होई; त्यांचीं उणीं उत्तरें सहन करावीं लागत. मुलें अज्ञानी असल्यामुळें त्यांस सर्व प्रकारें उभयतां चुलत्यांवर अवलंबून राहाणें भाग पडे. परंतु बिचारी करते काय? वारा येईल तशी पाठ दिली पाहिजे असें ह्मणून तीं मायलेंकरें दिवस कंठीत होतीं.

कुलीन घराण्यांतील संप्रदायाप्रमाणें बाळपणीं कुलोपाध्यायांपाशीं **केशव**नीं आपली जन्मभाषा बंगाली इचा थोडा बहुत अभ्यास केला. नंतर सात वर्षांचें वय असतां सन१८४५ सालीं **हिंदु कालेज** नांवाच्या विद्यालयांत ते जाऊं लागले. पुढें कांहीं वर्षांनीं **मेट्रापालिटन कालेज** नांवाचें एक नवीन विद्यालय स्थापन झालें व त्यांत मोठमोठ्या श्रीमान गृहस्थांचीं व सरदारांचीं मुलें जाऊं लागलीं असें पाहून **केशव**च्या चुलत्यानें आपल्या पुतण्यासही त्याच शाळेंत पाठविलें. येथें त्यांनीं १८५८ पर्यंत अभ्यास केला. ह्याच वर्षीं **केशव** ह्या पाठशाळेंतून निघाले.

**केशव** जात्या फार तैल बुद्धीचे होते. त्यांची कल्पनाशक्ति अत्यंत तीव्र असे; आणि त्यांस अश्रांत उद्योग करण्याचीही मोठी हौस होती. त्यांस गणित विषयाचा मोठा कंटाळा होता. गणिताचा त्यांस अगदीं वीट येई. त्यांच्या मोठ्या आवडीचे विषय ह्मटले ह्मणजे इंग्रेजी

भाषाध्ययन व तत्वज्ञान. कवितेचा त्यांस मोठा नाद. शेक्सपिअर, मिल्टन हे त्यांचे आवडते कवी व बेकन आणि बर्क हे त्यांचे अत्यंत प्रिय गद्यग्रंथकार. कल्पित कथानकें व कादंबऱ्या केशवनीं कधींच वाचल्या नाहींत. नाटकें वाचण्याची, पाहाण्याची, व कधीं मधीं तीं करून दाखविण्याची त्यांस मोठी हौस वाटे. एकाद्या खेळांत पतकरिलेल्या पात्राचें काम ते फारच उत्तम रीतीनें करीत. ही त्यांची नाटकाची हौस प्रौढ वयांत देखील कायम होती. धर्मप्रसाराच्या कामीं नाटकाचा उपयोग केला असतां त्यापासून एक महत्कार्य होईल असें वाटून त्यांनीं "नववृंदावन" नांवाचें एक धर्मविषयक नाटक रचून रंगभुमीवर त्याचा प्रयोगही करून दाखविला. या खेळांत ते स्वतः मुख्य पात्राचें काम करीत. तें इतकें उत्तम होई कीं तें पाहून हजारों माणसें थक्क होत !

केशव गर्भश्रीमान असल्यामुळें लहानपणीं त्यांचें लक्ष्य सुंदर वस्त्रें, डागडागिनें, गाडीघोडा यांकडे विशेष असे. परंतु तेव्हां देखील त्यांच्या मनाचा ओढा धर्माकडे असे. वस्त्रालंकाराची ही आवड फार दिवस टिकली नाहीं. विशी उलटून गेल्याबरोबर त्यांच्या मनाची वृत्ति पालटली. परंतु ती पालटण्याच्या अगोदर देखील

ऐषाराम, मौजमजा, सुखोपभोग, व चैनबाजी, यांकडे त्यांचें लक्ष्य कधींही गेलें नाहीं. ते नेहमीं ह्मणत कीं मी श्रीमान कुळांत जन्मलों आहें तरी मला या श्रीमंतीमध्यें देखील विरक्त राहिलें पाहिजे. ह्या त्यांच्या ह्मणण्यास मोठेपणीं विलक्षण प्रकारची सत्यता आली; तथापि ह्या विरक्त वृत्तीला प्रारंभ झाला ह्मणजे त्यांच्या विवाहकालापासून झाला असें ह्मटलें पाहिजे. **केशवचा** विवाह सन १८५६ सालीं झाला. तेव्हां त्यांचें वय १८ वर्षांचें होतें.

**केशवच्या** भावी मोठेपणाचीं चिन्हें त्यांच्या लहानपणीं देखील दृष्टोत्पत्तीस येण्यासारखीं होतीं. लहानपणीं खेळगड्यांबरोबर अगदीं साधारण खेळ खेळत असतां त्यांच्या मनाचा स्वतंत्रपणा विलक्षण रीतीनें दिसून येई. मुलें एकत्र जमून आज कोणता खेळ खेळावा हा विचार करूं लागलीं ह्मणजे कालचाच खेळ आज पुनः खेळावा असें पुष्कळांस वाटे. परंतु **केशवला** असें कधींच वाटलें नाहीं. तो नित्य नवा खेळ काढी; आणि तो इतका उत्तम असे कीं सर्व जण तो मोठ्या आवडीनें खेळत. तसेंच या सर्व खेळांत प्रमुख भाग असेल तो **केशव** आपणाकडे घेत. आश्चर्य हें कीं तितक्या लहान वयांतही त्यांच्या सर्व

खेळगड्यांवर त्यांचें इतकें वजन असें कीं ते सर्व त्यांचें सांगणें ऐकत व त्यांच्या तंत्रानें वागत. हें त्यांचें व्यक्तिस्वातंत्र्य मोठेपणीं विशेष उदयास येऊन हजारों माणसें त्यांनीं आपणासारखीं करून घेतलीं. त्यांच्या सहवासाचा असा कांहीं गुण होता कीं, एकमेकांस पाण्यांत पाहाणारीं अशीं देखील माणसें त्यांच्या समोर आपलें शत्रुत्व विसरून जात. त्यांच्या शिष्यवर्गांत कोणामध्यें भांडण झालें ह्मणजे केशवला एकांतांत गांठून प्रत्येक जण पाळी पाळीनें आपलें गाऱ्हाणें त्यांस सांगे. केशव दोघांचेंही समाधान करीत; आणि त्यामुळें दोघांसही बरें वाटे.

कालेजांतील विद्याभ्यास केशव वीस वर्षांचे असतांनांच पुरा झाला व त्यांनीं त्याच वेळीं कालेज सोडलें हें मागें सांगितलेंच आहे. तरी त्यांच्या इंग्रेजी भाषेच्या व तत्वज्ञानाच्या व्यासंगास खंड पडला नव्हता. त्यांचें विलक्षण बुद्धिवैभव पाहून त्यांच्या सर्व गुरूंनीं भाकित केलेंच होतें कीं—"हा मुलगा पुढें अलौकिक निपजेल !" केशवच्या वयास पुरीं अठरा वर्षें झालीं नाहींत तोंच त्यांचा वक्तृत्वप्रभाव अनुभवास येऊं लागला. समवयी मुलांच्या सभा स्थापन करून त्यांत व्याख्यानें देण्याचा, व भाषणें करण्याचा त्यांस मोठा नाद असे. अशा प्रका-

रच्या अनेक सभा त्यांनीं स्थापन केल्या होत्या. त्यांत ते तासांचे तास मोठमोठ्या गहन विषयांवर आवेशानें भाषणें करीत. सतत ग्रंथवाचन, अखंड मनन, आणि वारंवार भाषण हा त्यांचा क्रम बरींच वर्षे एकसारखा चालला होता. त्यांच्याकडून जें कांहीं ग्रंथावलोकन झालें तें याच वयांत झालें. पुढें प्रौढ वयांत कार्यबाहुल्यामुळें त्यांस तितका वेळही मिळेनासा झाला व त्यांच्या बुद्धीस विलक्षण प्रतीची परिपक्वावस्था आल्या कारणानें वाचनाची तितकी जरुरीही वाटेनाशी झाली.

केशव वैष्णवकुलांत उत्पन्न झाल्यामुळें मातापितरांप्रमाणें तेही स्वभावतहाच धार्मिक व भक्तिमान होते. पुढें त्यांच्या मनावर पाश्चात्य शिक्षणाचा योग्य संस्कार झाल्यावर त्यांच्या विस्तृत वाचनाच्या योगें केशवचे धर्मविचार उदार व उन्नत झाले. त्यांस वाटूं लागलें कीं परमेश्वराचें सत्य सर्व धर्मांत आहे; धर्माच्या संबंधानें मनुष्यांत जो कांहीं भिन्नभाव दृष्टोत्पत्तीस येतो तो मनुष्यांच्या दुरभिमानामुळें. अशा प्रकारची अंतःकरणाची वृत्ति झाल्यावर केशवचें मन एकेश्वरधर्माकडे वळूं लागलें. त्यांच्या बालसभेंत त्यांचे उद्गार निघत ते याच प्रकारचे असत.

**केशवच्या** घराजवळ **पंडित राजवल्लभ** नांवाच्या एका पंतोजीची एक बंगाली शाळा होती. **राजवल्लभ** हा जुन्या प्रकारचा परंतु मोठा धूर्त व अमळ उदार विचाराचा गृहस्थ होता. त्यास संस्कृत भाषेचें वेडें वांकडें ज्ञान होतें, व ह्यास ब्राह्मसमाजाची थोडी बहुत माहिती असून त्यानें ब्राह्मधर्मविषयक कांहीं पुस्तकें वाचिलीं होतीं. त्याच्या भाषणांत एक प्रकारची गोडी असे, ह्मणून **केशव** त्याच्या घरीं कधीं कधीं जात व त्याच्याशीं तास दीड तास बोलत बसत. आपल्या अल्पवयी मित्राचे असे उदार विचार ऐकून एके दिवशीं **राजवल्लभनें केशवला** ब्राह्मधर्मसंबंधीं एक पुस्तक दिलें. तें वाचून त्यांना विलक्षण आनंद झाला व फार समाधान वाटलें. ब्राह्मधर्माच्या सिद्धांतांमध्यें व त्यांच्या अंतस्थ विचारांत अविच्छिन्न ऐक्य आहे हें पाहून त्यांस मोठा चमत्कार वाटला. एव्हांपासून **केशवचें** लक्ष्य ब्राह्मसमाजाकडे लागलें. पहा, मोठमोठ्या गोष्टींचें मूळ कारण किती यःकश्चित व साधारण असतें तें! आपण दिलेलें पुस्तक इतकें फलद्रूप होऊन पुढें हें पोर ब्राह्मसमाजास असें उज्वल स्वरूप आणील व त्याच्या कीर्तीनें सारें जग दुणाणून टाकील हें **राजवल्लभ** पंतोजीच्या स्वप्नीं तरी होतें काय?

अर्थात त्या वेळीं नुस्ता आदिसमाजच होता. त्याचें प्रमुखत्व **देवेंद्रनाथ टागोर** यांचेकडे होतें. हा भक्तिमान पुरुष अद्यापि जीवंत आहे. त्या वेळीं ते भर तारुण्यांत होते. **देवेंद्र** हे श्रीमान असून सरदारी कुलांतील पुरुष. कुलीन घराण्यांतील तरुण मंडळी ब्राह्मसमाजांत आणण्याविषयीं त्यांचा फार प्रयत्न असे. **केशवही** श्रीमान व कुलीन घराण्यांतील असल्यामुळें **देवेंद्रनाथांची** व त्यांची साधारण तोंडओळख होती. प्रत्यक्ष परिचय मात्र नव्हता. याच सुमारास **केशवनीं** "गुड-वुइल फ्राटर्निटी" नांवाची एक मंडळी स्थापन केली होती. तींत मोठमोठ्यांचीं मुलें जात असत. तेथें **देवेंद्रनाथ** हेही कधीं कधीं निमंत्रणावरून जात व अध्यक्षस्थान स्वीकारून मुलांस उत्तेजन देत. तेव्हां त्या सभेंत **केशवचें** बालपणचें वक्तृत्व ऐकून त्यांचा उत्साह व आवेश पाहून त्यांच्याविषयीं **देवेंद्रनाथांच्या** मनांत विलक्षण प्रेम उत्पन्न होई. हा सिंहशावक मोठा झाल्यावर आपल्या सिंहनादानें सकल आर्यावर्त दणाणून सोडील असें त्या महा पुरुषाच्या मनांत कधींच येऊन चुकलें होतें! **राजवल्लभनें** दिलेलें ब्राह्मधर्मविषयक पुस्तक **केशवच्या** हातांत पडलें तें याच संधीस. त्याच्या

वाचनानें केशवचें मन ब्राह्मसमाजाकडे वळलें आणि लवकरच त्यांनीं ब्राह्मधर्माची दीक्षा घेतली. ही गोष्ट देवेंद्रनाथांच्या पश्चात् झाली. कारण त्या वेळीं ते कलकत्त्यांत नव्हते. कोठें बाहेर गेले होते. ते परत आल्यावर जेव्हां त्यांस समजलें कीं केशव समाजाचे सभासद झाले तेव्हां त्यांस अत्यानंद झाला व परम संतोष वाटला. ही गोष्ट इ० स० १८५७ सालीं झाली.

केशव आदिसमाजाचे सभासद झाल्या दिवसापासून त्यांच्यावर देवेंद्रनाथांचा विशेष लोभ जडत चालला. ह्या दोन महापुरुषांचें एकमेकांवर इतकें प्रेम होतें तरी त्यांच्या स्वभावांत व गुणांत पुष्कळ गोष्टींच्या संबंधानें भिन्नता होती. केशव आपल्या तारुण्याच्या अगदीं प्रथम अवस्थेंत होते; त्यांचें शिक्षण नव्या तऱ्हेचें असून त्याचा त्यांच्या मनावर पूर्ण परिणाम झाला होता; केशव स्वभावतहाच धर्मशील होते, परंतु त्यांच्या शिक्षणाच्या योगें त्यांच्या धर्मस्वभावास लौकिक स्वरूप प्राप्त होऊन लोकोपयोगीं व देशकल्याणाचीं कामें करण्याकडे त्यांच्या मनाची फार धाव होती. देवेंद्रनाथांचें तारुण्य उलटून त्यांस प्रौढावस्था प्राप्त झाली होती. इंग्रजी भाषेशीं त्यांचा फारसा परिचय नसल्यामुळें त्यांच्या मनावर जो

कांहीं संस्कार झाला होता, तो मुख्यतः संस्कृत आणि अंशतः फारशी भाषेच्या द्वारें झाला होता. त्यांची वृत्ति शांत, गंभीर असे व त्यांस एकांतवासाची फार आवड असे. ते ईश्वरध्यानांत व ईश्वरगुणाचिंतनांत बहुशः मग्न असत. लौकिक कार्यांकरितां व जानपदिक कृत्यांकरितां त्यांच्याजवळ कोणी सहाय्य मागण्यास गेला तर त्यास ते उदार आश्रय देत. परंतु अशा कृत्यांकडे आपण विशेष लक्ष्य द्यावें व खटपट करावी असें त्यांच्या मनांत फारसें येत नसे. दोघेही पुरुष थोर. परंतु दोघांपैकीं प्रत्येकाचा थोरपणा कांहीं निराळ्या प्रकारचा. एकेकाच्या मोठेपणाची योग्य कल्पना मनांत येण्याकरितां जड वस्तूंचा दृष्टांत द्यावयाचा ह्मणजे देवेंद्रनाथांची वृत्ति सागरासारखी व केशवची एकाद्या प्रचंड नदीसारखी होती असें ह्मटलें पाहिजे. सागर शांत, विस्तीर्ण, गंभीर असा असतो! त्याजवर मोठमोठीं जहाजें गलबतें चालत असतात व त्यांच्या द्वारें त्याच्या पृष्ठावर लाखो रुपयांचा व्यापार चालू असतो; परंतु त्याचें उन्नत स्वरूप पाहाण्याची ज्याची इच्छा असेल त्यास आपण होऊन सागरासन्निधच गेलें पाहिजे! तो ह्मणून आपलें स्थान बदलणार नाहीं. इकडे नदीची थोरवी कांहीं निराळ्या

प्रकारची ! गंगेसारखी प्रचंड नदी उच्चशैलशिखरावरून निघते ती फूं फूं करीत मोठ्या वेगानें नाना देशांतून वहात जाऊन आपल्या अमृततुल्य शीतल उदकाच्या द्वारें प्राणिमात्रांचा ताप निवारण करून त्यांचा आत्मा शांत करिते! **महर्षि देवेंद्रनाथ** ह्मणजे भक्ति, ज्ञान, वैराग्य यांचा महासागर होत! **साधु केशवचंद्र** ह्मणजे प्रेम, दया, शांति, परोपकार यांसंबंधानें प्रति सिंधु नद !

याप्रमाणें हे दोन पुरुष परस्परभिन्न परंतु ब्राह्मसमाजांत त्यांचें ऐक्य झालें व दोघेही भक्तिमान व धर्मशील असल्यामुळें एकमेकांवर त्यांचें अलौकिक प्रेम जडलें. **केशव** ब्राह्मसमाजाचे सभासद झाले व **देवेंद्रनाथांशीं** त्यांचा प्रेमभाव वाढत चालला हें पाहून **केशवच्या** घरच्या माणसांस फारच वाईट वाटलें. तेव्हांपासून तीं त्यांचा छल करूं लागलीं. हा सर्व छल **केशव** निमुटपणें सहन करीत. इकडे **देवेंद्रांच्या** सहवासानें **केशवच्या** धार्मिक स्वभावास विलक्षण बळकटी आली. ते दिवसाचा बराच काळ **देवेंद्रांच्या** समागमांत घालवीत. त्यांच्या सहवासास राहून त्यांच्या बरोबर उपासना, संभाषण, धर्मचर्चा केल्यानें **केशवचा** धर्माग्नि प्रज्वलित झाला. शेवटीं आदिसमाजांत **केशवचा** अधिकार वाढत चालला,

तो इतका कीं त्यांचा विश्वास, उत्साह, व धर्मभाव पाहून **महर्षि देवेंद्रनाथांनीं** त्यांस **ब्रह्मानंद** हें नांव दिलें. याच नांवानें अद्यापि ते पुष्कळांस माहीत आहेत. हें नांव फार योग्य व सार्थ आहे.

आदिसमाजांत **केशवचा** अधिकार शेवटीं इतका वाढला कीं सन १८६२ च्या एप्रिल महिन्याच्या १३व्या तारखेस **महर्षि देवेंद्रनाथांनीं** त्यानां ब्राह्मसमाजाचे आचार्य नेमिले. समाजाचे **प्रधानाचार्य** स्वतः **महर्षींच** होते. इतर कित्येक जण असत, त्यांस "उपाचार्य" ही संज्ञा होती. **केशवला** आचार्याचा अधिकार देण्याचा विधि मोठ्या थाटाचा व समारंभाचा झाला. इकडे समाजांत **केशवचा** अधिकार जसजसा अधिकाधिक वाढत गेला तसतसा त्यांच्या घरीं त्यांस अधिक जाच होई. शेवटीं हा जाच इतका कांहीं वाढला कीं अखेरीस त्यांचा निरुपाय होऊन त्यांस आपल्या पत्नीसह **देवेंद्रांच्या** घरी येऊन राहाणें भाग पडलें.

**देवेंद्र** आणि **केशव** यांमधील अलौकिक प्रेमभाव पाहून कित्येक दुष्ट लोकांच्या मनांत मत्सरबुद्धि उत्पन्न झाली व त्यांनीं दोघांमध्यें कोणत्या तरी उपायांनीं वितुष्ट पाडण्याचा गुप्त प्रयत्न चालविला. सामाजिक

सुधारणेच्या संबंधानें ह्याच सुमारास केशवचे जे कांहीं परिश्रम चालले होते त्यांच्या योगें वरील मत्सरी लोकांच्या प्रयत्नास सत्वर यश आलें.

**देवेंद्रनाथ** व **केशवचंद्र** यांच्या मूळस्वभावामध्यें जो एक मोठा भेद होता तो मागें सांगितलाच आहे. देवेंद्रांच्या सहवासानें **केशवचा** धर्मभाव दृढ होऊन त्यांची आत्मोन्नति होत होती; परंतु त्यांची तेवढ्यानें तृप्ति झाली नाहीं. त्यांच्या धर्मवासनेनुरूप ते देशोन्नतीच्या कार्यास झटत होते. विधवाविवाह, बालविवाहप्रतिबंध, भिन्न वर्णांच्या स्त्रीपुरुषांचे विवाह या संबंधानें **केशव** नेहमीं खटपट करीत. या सर्व गोष्टी धर्मदृष्टीनें झाल्या पाहिजेत व त्या ब्राह्मधर्माच्या द्वारें सहज होण्यासारख्या आहेत असें ते वारंवार ह्मणत. पहिल्या पहिल्यानें देवेंद्र त्यांस मुळींच आड आले नाहींत. परंतु ही संधि साधून **केशवच्या** शत्रूंनीं देवेंद्रांचें मन दूषित करण्याचा प्रयत्न चालविला. त्यांनीं त्यांच्या मनांत भरविलें कीं बाह्य सुधारणेचा हा क्रम कांहीं दिवस असाच चालल्यास आपल्या समाजाचें सामर्थ्य द्विधा होऊन धर्माचा ऱ्हास होईल व ह्या पाश्चात्य सुधारणेचेंच प्राबल्य वाढेल. ह्याप्रमाणें देवेंद्रांचें मन

दूषित झाल्यावर **केशव**विषयीं त्यांच्या मनांत अविश्वास उत्पन्न होण्यास उशीर लागला नाहीं. हळूं हळूं सुधारणेच्या कार्यास **देवेंद्र** आड येऊं लागले. इकडे **केशव**च्या मनाची तर सर्व ओढ अशा लौकिक कार्यांकडे ! हा ओढाताणीचा प्रकार बरेच दिवस चालला.

ह्या वेळीं आदिसमाजांत **देवेंद्रनाथां**चा एक व **केशव**चा एक, असे दोन पक्ष होते. श्रीमंती, ऐश्वर्य, संपत्ति, वैदिक विद्या ह्या गोष्टी पहिल्या पक्षास विशेष अनुकूल होत्या. विचार, अधिकार, नवीन तऱ्हेची विद्या, उत्साह, साधारण लोकांत मानमान्यता ह्या गोष्टी दुसऱ्या पक्षास अनुकूल होत्या. **देवेंद्रनाथां**च्या दुराग्रहापुढें **केशव**चें कांहीं एक चालेनासें झालें. शेवटीं निरुपाय होऊन **केशव** आदिसमाजांतून निघाले व त्यांनीं **भारतवर्षीय ब्राह्मसमाजाची** स्थापना केली. ही गोष्ट सन १८६६ च्या नोव्हेंबर महिन्याच्या ११ व्या तारखेस झाली.

भारतवर्षीय ब्राह्मसमाजाची स्थापना होण्याच्या अगोदरपासूनच **केशव**च्या मोहक वक्तृत्वाविषयीं चहूंकडे ख्याति झाली होती. तथापि त्यांची जी विशेष प्रसिद्धि झाली ती ह्यानंतर झाली यांत संशय नाहीं. **भारतवर्षीय**

समाजांत केशवच्या धर्मबुद्धीचा एकसारखा विकास होत गेला. त्यांची प्रार्थना, त्यांची उपासना, त्यांचे उपदेश इतके प्रेमळ असत कीं ते ऐकून त्यांचा श्रोतृसमाज सद्गदित होऊन टपटप अश्रुपात करी, त्यांचें आवेशयुक्त भाषण श्रवण करून त्यांचे शत्रूही थक्क होत. आपल्या धर्मप्रीत्यर्थ केशवनीं आपल्या सर्वस्वाचा होम केला होता. त्यांची निस्सीम भक्ति, आणि विलक्षण वैराग्य यांच्या योगें त्यांनीं एक नवीन शिष्यवर्ग तयार केला. ह्यांपैकीं पुष्कळांनीं सर्व ऐहिक धनमान एका बाजूस ठेवून ब्राह्मधर्माच्या प्रचारकांचें काम पतकरिलें. केशवच्या भक्तिभावाची जसजशी उन्नति होत गेली तसतसें त्यांच्या वैराग्यास राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें. त्यांनीं भगवें वस्त्र धारण केलें, हातामध्यें करताल व एकतारा घेऊन आपल्या शिष्यवर्गासह गांवांतून नगरसंकीर्तन करीत फिरण्याचा क्रम चालविला. केशवसारखा वक्ता, विद्वान, व इंग्रजी शिकलेला पुरुष अशा रीतीनें काषायवस्त्र परिधान करून एवढ्या उत्साहानें ज्या धर्माचा उपदेश करीत आहे त्यांत कांहीं तरी विलक्षण सत्व असलें पाहिजे, असें अगदीं साधारण लोकांस देखील वाटूं लागलें! ब्राह्मधर्माचा विलक्षण प्रसार होऊं लागला. शेवटीं सन १८६८ सालीं सर्व हिंदुस्था-

नांतील मुख्य मुख्य स्थानीं जाऊन ब्राह्मधर्माचा उपदेश करावयाच्या उद्देशानें केशव प्रवासास निघाले. त्या वेळीं बरोबर निवडक शिष्य मंडळी होती. जेथें जेथें धर्मप्रचार करण्याकरितां हे जात तेथें तेथें ह्यांचें संकीर्तन ऐकून लोकांच्या अंतःकरणास द्रव येई. ह्या प्रवासांत मोंगीर मुक्कामीं असा चमत्कार झाला कीं सहस्त्रावधि लोक ह्या साधुवृंदाच्या भजनीं लागले; त्यांचें प्रेमळ गायन ऐकून सर्वांचीं मनें तल्लीन होत.

ह्याप्रमाणें ब्राह्मधर्माचा प्रसार होत असतां सन १८७० सालीं केशवनीं विलायतेस जाण्याचा निश्चय केला. ते फेब्रुआरी महिन्याच्या १९ व्या तारखेस कलकत्याहून निघाले व त्याच वर्षाच्या आक्टोबर महिन्याच्या १९ वीस परत मुंबईस आले. केशवचे विचार व वक्तृत्व पाहून तिकडील लोक चकित झाले. इंग्रजी आमची जन्मभाषा खरी, तरी केशवसारखें वक्तृत्व थोड्याच इंग्रज लोकांस साधेल, असें तिकडील मोठमोठ्या मार्मिक लोकांनीं स्पष्ट ह्मणून दाखविलें आहे. केशवच्या ह्या प्रवासापासून ब्राह्मसमाजास व एकंदर सर्व देशास अनेक लाभ झाले आहेत. तिकडच्या लोकांस ब्राह्मसमाजाविषयीं ज्ञान झालें व त्याचप्रमाणें इकडील लोकांची

विद्वत्ता, बुद्धिवैभव, ज्ञानाधिकार याविषयीं त्यांस पुष्कळ नवीन गोष्टी समजल्या व त्यांच्यायोगें हिंदुस्थान देशाविषयीं त्यांची पूज्य बुद्धि वाढली.

इंग्लंदाहून आल्यानंतर पांच सहा वर्षेंपर्यंत सामाजिक सुधारणेच्या संबंधानें केशवनीं फार मेहनत केली. विद्येचा प्रसार करून विचार जागृत करण्याकरितां त्यांनीं अनेक शाळा, कालेजें, पुस्तकालयें, सभा, व मंडळ्या स्थापन केल्या. ह्या सर्व कामीं लोकांनीं व सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यांस पुष्कळ सहाय्य केलें. आपल्या स्त्रियांची उन्नती होण्याकरितां त्यांनीं "भामाहितैषिणी सभा" या नांवांची एक स्त्रियांची सभा स्थापन केली व "भामाबोधिनी" नांवाचें एक वर्तनपत्रही सुरू केलें. सन १८७३.सालीं "ब्राह्मविवाहाचा कायदा" करण्यांत आला तोही त्यांच्याच परिश्रमानें.

सामाजिक सुधारणेच्या ह्या गोष्टी होत असतां समाजाच्या कामांत यत्किंचितही खंड पडला नव्हता. तथापि वरील गोष्टींची व्यवस्था झाल्याबरोबर त्यांनीं समाजाच्या धर्मोन्नतीचें काम पुनः हातीं घेतलें. ह्या कार्याकरितां सन १८७६ सालीं कलकत्त्यापासून थोड्या अंतरावर एक बाग तयार करून त्यास **साधनकानन**

असें नांव दिलें. ह्या ठिकाणीं ते व त्यांचा निकट शिष्य-वर्ग दिवसाचा बहुतेक काल, भजन, भक्ति, ध्यान, उपासना यांत घालवीत. या काननामध्यें त्यांनीं जें कांहीं धर्मसाधन केलें त्याच्या योगें त्यांच्या प्रार्थना व उपासना अत्यंत हृदयद्रावक झाल्या. "ईश्वरप्रार्थना हें माझें जीवन; माझ्या आत्म्याचें अन्न" असें ते नेहमीं ह्मणत. त्यांच्या वाणीच्या आंगीं जें विलक्षण सामर्थ्य आलें होतें तें त्यांच्या प्रार्थनेमुळें. ते एकदां प्रार्थना करूं लागले ह्मणजे त्यांच्या मुखांवर विलक्षण कांति येई, नेत्रांतून खळखळ अश्रुपात होई, कंठ सद्गदित होऊन त्यांचें सर्व शरीर तेजःपुंज दिसे. त्यांची भक्ति अवलोकन करून व त्यांची प्रार्थना ऐकून पक्के बाणेदार नास्तिक व पाषाणहृदयी निंदक यांचीं देखील शरीरें रोमांचित होत. अशा प्रकारचा भक्तिभाव या एकोणिसाव्या शतकामध्यें अलौकिक यांत संशय नाहीं.

केशवचा जन्म श्रीमान कुलांतील खरा; परंतु ते फार वैराग्यशील होते. ते मोठे होऊन स्वतंत्र झाल्यावर राजगृहासारख्या वैभवयुक्त गृहामध्यें राहात असतांही ते वारंवार एकाद्या नंग्या फकिराप्रमाणें राहात. आपल्या मनोवृत्तींवर जय मिळवून कांहीं विशेष धर्म-

साधन करण्याकरितां ते नाना प्रकारचीं व्रतें घेत. कांहीं दिवस ते स्वतः स्वयंपाक करीत व नुसत्या जमिनीवर अन्न ग्रहण करीत! एके वेळेस त्यांनीं एक महिनाभर भिक्षावृत्ति धारण केली होती! तितक्या दिवसांत त्यांस नित्य जें कांहीं भिक्षेनें मिळे त्यावरच ते निर्वाह करीत! अशा प्रकारचें वैराग्य पाहून कोणाच्या मनाची वृत्ति पालटणार नाहीं?

सन १८७८ पर्यंत भारतवर्षीय ब्राह्मसमाजाची धर्मोन्नति एकसारखी चालली होती. **प्रधानाचार्य ब्रह्मानंद बाबु केशव** आणि त्यांचा शिष्यवर्ग यांच्या भक्तीस लौकिक स्वरूप प्राप्त होऊन ते नित्य नगरसंकीर्तन करीत, गांवच्या रस्त्यांतून नाचत, उडत, व सतार, वीणा, मृदंग, शंख, तुताऱ्या आदिकरून वाद्यांचा गजर करून सर्व नगर दणाणून सोडीत. अशा प्रकारच्या त्यांच्या उत्साहाच्या योगें हजारो लोक तन्मय होऊन हरिनामसुधा सेवन करून त्यांच्या बरोबर नांचत. ह्याप्रमाणें ब्राह्मसमाजाचा उत्कर्ष चालला होता. परंतु **केशव**च्या भक्तीस तें राष्ट्रीय स्वरूप आलेलें पाहून समाजांतील कित्येक तरुण व पाश्चात्य विद्येच्या डौलांत असणाऱ्या क्षुद्रदृष्टि लो-

कांस फार वाईट वाटे. यास द्वेषामत्सराचीं दुसरीं अनेक कारणें होतींच. तशांत सन १८७८ सालीं केशवच्या मुलीचा विवाह कुच बिहारच्या महाराजांशीं झाला. या विवाहाच्या प्रकरणानें जो वाद माजला त्याच्या योगें केशवची उज्वल कीर्ति कलंकित झाली असें पुष्कळांस वाटतें. या विवाहाच्या एकंदर परिणामांवरून पाहातां त्याच्या योगें ब्राह्मसमाजास जे कांहीं लाभ होणार ह्मणून केशवनीं भाकित केलें होतें ते सर्व लाभ होऊन चुकले आहेत. शिवाय या कामीं स्वतः केशवकडून जितकी हुशारी होण्यासारखी होती तितकी त्यांनीं केली होती. इतक्यावरही जर मुलाकडच्या माणसांनीं कांहीं अयोग्य प्रकार केला तर त्याबद्दल केशवला दोष देतां येत नाहीं. तरी या विवाहाच्या प्रकरणांत त्यांच्याकडे थोडा दोष होता असें जरी ह्मटलें तरी त्यावरून केशवची किंमत काडीभरही कमी होत नाहीं. केशव कितीही थोर, पवित्र व शुद्ध पुरुष असले तरी ते ह्मणजे प्रमादरहित सर्वथा निर्दोष असे होते असें कोणाचेंही ह्मणणें नाहीं. आजपर्यंत असा कोणीच झाला नाहीं. तेव्हां त्यांच्या हातून प्रमाद झाला तर तो मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. तेव-

त्यावरून त्यांच्या इतर अलौकिक गुणांची वास्तविक योग्यता कालत्रयींही उणी होणार नाहीं.

या कुच बिहार प्रकरणाच्या संबंधानें कोणाचे विचार कसेही असोत. त्याच्या योगें खुद्द केशवच्या मनावर दोन महत्वाचे परिणाम झाले. त्यांपैकीं, बाह्यात्कारें सख्य दाखवून आपणाशीं मोठ्या प्रेमानें वागणाऱ्या मंडळींतही आपले बरेच हितशत्रु आहेत असें केशवच्या अनुभवास आलें हा एक; आणि हा निराशेचा प्रकार दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें त्यांच्या चित्तास अधिक उद्विग्नता आली हा दुसरा. कोणत्याही कारणामुळें चित्त उद्विग्न झालें असतां भक्ति ध्यान यांचें अधिक साधन करावें व समाधान प्राप्त करून घ्यावें असा केशवचा नियम असे. त्या अन्वयें ह्या प्रसंगीं त्यांनीं विशेष धर्मसाधन केलें. जन्मास येऊन त्यांस जें कांहीं महत्कार्य करावयाचें होतें तें ह्याच सुमारास पूर्ण झालें. ब्राह्मधर्मास अत्यंत उदार व सार्वत्रिक स्वरूप आणून त्यामध्यें सर्व धर्मांचें पूर्ण ऐक्य करण्याकरितां साधु केशव जन्मास आले होते. त्यांच्या जीवनाचा हा महत्कार्यभाग त्यांनीं ह्याच प्रसंगीं पूर्ण केला. ह्या कार्याचें बीज राजाराम मोहन राय यांनीं प्रथमतः पेरिलें;

देवेंद्रनाथांनीं त्यास पाणी घालून वाढविलें; आणि केशवनीं त्या कोमल रोपाचा प्रचंड वृक्ष करून त्यास फलद्रूप केलें. परमेश्वराचें पवित्र सत्य सर्व धर्मांत आहे एवढेंच ह्मणून केशव राहिले नाहींत. भक्ति, ज्ञान, आणि वैराग्य यांच्या संबंधानें प्रत्येक धर्मांत जेवढें ह्मणून उत्तम व अनुकरणीय आहे, तेवढें एकत्र करून त्याच्या योगें सर्व धर्मांचें त्यांनीं ऐक्य केलें. त्यांच्या मनांत ही कल्पना बहुत वर्षांपासून होती. दर वर्षास उत्सवाचे प्रसंगीं त्यांचें जें जाहीर भाषण होत असे त्यामध्यें ते ह्या कार्याचा उल्लेख करीत असत. दिवसानुदिवस हे उल्लेख स्पष्ट होत जाऊन शेवटीं सन १८७५–७६ च्या सुमारास ते बरेच उघड झाले. इतर धर्मांच्या द्वारें परमेश्वरानें जसें एकेक महत्कार्य करविलें आहे, त्याप्रमाणें ब्राह्मधर्माच्याही द्वारें कांहीं अलौकिक कार्य व्हावयाचें आहे—तें करण्यासाठींच परमेश्वरानें ब्राह्मधर्म पाठविला आहे—असें त्यांनीं स्पष्ट ह्मणून दाखविलें. हें कार्य ह्मटलें ह्मणजे निरनिराळ्या धर्मांतील भक्ति, ज्ञान, वैराग्य यांच्या मार्गांचें एकीकरण करणें हें होय. केवळ विचाराच्या दृष्टीनें यांची एकवाक्यता करावयाची एवढेंच नव्हे, तर त्यांप्रमाणें धर्माचरण करून सर्व धर्ममार्गांचें ऐक्य ज्या-

च्या योगें आपणास नित्य अनुभवितां येईल अशा धर्माची स्थापना करावयाची. हें कार्य परम दुस्तर, परंतु तें करण्याकरितांच **केशव** जन्मले होते.

**कुच बिहार** प्रकरणाचें वावटळ शांत झालें नाहीं तोंच **केशवनीं** पुनः घोर वैराग्यसाधनास आरंभ केला. त्यांचा व त्यांच्या शिष्यमंडळीचा दिवसाचा बहुतेक काल उपासनेंत जाऊं लागला. रात्रौ कधीं कधीं दोन दोन वाजेपर्यंत धर्मचर्चा होत असे! कधीं कधीं एकांत स्थलीं जाऊन तेथें ते दिवसांच्या दिवस राहात; अनेक घोर व्रतांचें आचरण करीत. शेवटीं, सर्व धर्मांचें ऐक्य करणें हा जो ब्राह्मसमाजाचा मुख्य कार्यभाग तो त्यांनीं **नवविधान** धर्माच्या योगें पूर्ण केला. हें धर्मैक्य साधारण जनांच्या देखील एकदम लक्ष्यांत यावें म्हणून **केशवनीं** अनेक संस्कार व कर्में लावून दिलीं. तीं लावून देतांना त्यांमधील जडपणा दूर करून त्यांचा वास्तविक अर्थ अज्ञ जनांच्या सहज लक्ष्यांत येई अशा रीतीनें तीं सर्व सार्थ केलीं. सन १८८१ सालीं **नवविधानध्वजारोपण** या नांवाचा एक संस्कार त्यांनीं केला, त्यांत ह्या **नवविधानाचा** हेतु उत्तम रीतीनें स्पष्ट करून सांगितला. यामध्यें सर्व राष्ट्रें, सर्व लोक, सर्व धर्म, सर्व

लोकाचार, सर्व भक्तिमार्ग, सर्व वैराग्यसाधनें यांचें ऐक्य झालें आहे; ह्या ऐक्याचें दर्शक अशी ही जयध्वजा हिच्या संरक्षणार्थ हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पार्शी इत्यादि सर्व धर्मांच्या लोकांनीं झटावें; आज कालपर्यंतचा आपला सर्व द्वेषभाव विसरावा आणि एक अंतःकरणानें, एक भावानें विश्वजननीस शरण जावें, असें स्पष्ट करून सांगितलें. याप्रमाणें, सर्व धर्मांस आधारभूत अशीं जीं सर्वसाधारण धर्मतत्वें तीं पाया धरून त्यावर ब्राह्मधर्माची इमारत केशवनीं रचिली. तिचीं सर्व अंगें सारखीं बळकट करण्याच्या कामीं त्यांनीं आपल्या आयुष्याचा शेष भाग खर्ची घातला.

वैराग्याशिवाय धर्मसाधन होणार नाहीं व धर्मसाधन केल्याशिवाय धर्मरक्षण होणें संभवत नाहीं, हें केशवनीं पक्केंपणीं जाणिलें होतें. यास्तव त्यांनीं परम घोर व्रताचरणास आरंभ केला. अन्न हातानें शिजवावयाचें, एकभुक्त राहावयाचें, जमिनीवर भोजन करावयाचें, भिक्षा मागावयाची इत्यादि प्रकारचीं दारुण व्रतें त्यांनीं एकसारखीं चालविलीं. ही त्यांच्या स्वतहाच्या धर्मसाधनांची गोष्ट झाली. भक्ति आणि उपासना यांचाही क्रम असाच एकसारखा अव्याहत चालू होता. शिष्यवर्गाबरोबर

प्रातःकालपासून तों दोनप्रहरपर्यंत नित्य उपासना करावयाची, कधीं कधीं मोठमोठीं नगरसंकीर्तनें करावयाचीं, शिवाय मंदिरांत नेहमीं उपासना उपदेश करावयाचा, हींही कामें झपाट्यानें चालूं होतींच. याशिवाय व्याख्यानें देणें व वर्तमानपत्रें चालवणें यांसही खंड पडला नव्हता. त्यांचें **नवविधान** नांवाचें पत्र ते एकटे चालवीत व त्या कालीं त्यांत इतके उत्तम लेख येत असत कीं, त्यांचे शत्रू देखील नवीन अंकाची वाट चातकाप्रमाणें पाहात. **केशवची** वाणी जशी अलौकिक होती तशीच त्यांची लेखणीही अनुपमेय होती. **कुच बिहार** प्रकरणापासून त्यांच्याविषयीं लोक हवें तें बोलत व लिहीत. **नवविधान** उदयास आल्या दिवसापासून तर या निंदात्मक लेखांचा अगदीं कहर उसळला होता. त्या सर्वांस उत्तर देण्याच्या भरीस ते कधींही पडले नाहींत, तरी मित्रांच्या आग्रहावरून असल्या मिथ्या दोषांचें निवारण करणें त्यांस भाग पडे.

अशा प्रकारच्या शरीरक्लेशानें, कार्यबाहुल्यानें व अश्रांत परिश्रमानें **केशव** अशक्त होत चालले. त्यांचें शरीर स्थूल असल्यामुळें सतेज, कांतिमय आणि सुदृढ दिसे, परंतु त्यांच्या आंगीं कुवत नव्हती. शेवटीं, सन

१८८२ सालाच्या आरंभीं त्यांस मधुमेहाची व्यथा जडली. त्यांस ही व्यथा बरेच वर्षांपासून होती, परंतु ती या सुमारास विशेष प्रबल होऊन समजण्यांत आली. ह्या रोगानें त्यांची शक्ति क्षीण होत चालली.

सन १८८२ साल कसेंबसें लोटलें, आणि सन १८८३ च्या प्रारंभीं उत्सवांत दरसालप्रमाणें केशवचें व्याख्यान झालें. "युरोपास आशिया खंडाचा निरोप" असा या व्याख्यानाचा विषय होता. केशव अडीच तासपर्यंत एकसारखे बोलत होते! आपल्या अप्रतिम वक्तृत्वप्रभावानें व अलौकिक विचारसरणीनें त्या दिवशीं त्यांनीं सर्व श्रोतृसमाज थक्क करून सोडिला. हें त्यांचें शेवटचें भाषण! खरेंच आहे! जो "निरोप" सांगण्याकरितां आपल्या परम थोर दैवी पित्याची आज्ञा घेऊन ते इहलोकीं आले होते तो सांगितल्यावर इकडे राहाण्याचें त्यांचें काय प्रयोजन?

वरील व्याख्यान जानेवारींत झालें. यानंतर त्यांची प्रकृति एकसारखी खचत चालली. शेवटीं एप्रिल महिन्यांत वैद्यांच्या सांगण्यावरून हवा बदलण्यास ते सिम्ल्यास गेले. तेथें गेल्यावर मार्गाच्या परिश्रमामुळें त्यांस तापही येऊं लागला. हा ताप अमळ कमी झाला नाहीं तोंच

त्यांस स्फूर्ति झाली कीं नवविधान भक्तवृंदाच्या नियमनार्थ एकादा ग्रंथ लिहावा. अशा प्रकारच्या ग्रंथाची आवश्यकता बरेच दिवसांपासून त्यांस वाटत होती. परंतु ह्या कार्यास जी फुरसत व चित्ताची एकाग्रता लागते ती आजपर्यंत त्यांस मिळाली नव्हती. ती मिळतांक्षणींच त्या तशा अशक्त स्थितींत देखील त्यांनीं ह्या ग्रंथास प्रारंभ केला. तो ग्रंथ ही नव संहिता होय ! सिम्ल्यास असतांना देखील त्यांचा मधुमेहाचा आजार एकसारखा वाढत गेला. इकडे कलकत्त्यांत त्यांच्या दरबार मंडळांतही कांहीं गैरसमज उत्पन्न होऊन कलहास आरंभ झाला होता. त्यामुळें त्यांचें चित्त अधिकच चिंतातूर झालें. ह्या वेळच्या त्यांच्या प्रार्थना फारच प्रेमळ व हृदयद्रावक असत. त्यांपैकीं कांहीं छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांवरून स्पष्ट दिसतें कीं, आपला अंतकाल समीप येत चालला आहे हें केशवनीं चांगलें जाणिलें होतें.

सन १८८३ सालाच्या अक्टोबर अखेर केशवनीं सिम्ला सोडला, आणि ते कलकत्त्यास आले. त्यावेळीं त्यांची प्रकृति एकसारखी अशक्त होत चालली होती. अशा अवस्थेंत असतां त्यांनीं नित्योपासनेकरितां

आपल्या बागेंत "कमलकुटिर" नांवाचें एक लहानसें मंदिर बांधिलें. वर्षाखेरीचे दोन महिने नोव्हेंबर आणि डिसेंबर अगदीं अजारांत गेले. नवीन मंदिराचा प्रवेशसमारंभ ता० १ जान्युआरी १८८४ रोजीं करावयाचा असें ठरविलें होतें. त्या दिवशीं **केशवची** प्रकृति फारच बिघडली होती, तरी सर्व समारंभ करावयाचाच असा त्यांनीं आग्रह धरिल्यावरून त्यांस खुर्चीवर बसवून चार पांच जणांनीं उचलून नेलें आणि वेदीवर बसविलें. तशा स्थितींत त्यांनीं मंदिर ईश्वरार्पण केलें आणि शेवटची प्रार्थना केली. तींत त्यांनीं आपलें सर्व हृद्गत ईश्वरापुढें ओतिलें.

या श्रमाच्या योगें प्रकृतीचें मान फारच भडकलें. रोग फार भयंकर असल्यामुळें शरिरास दुस्सह क्लेश होत. तरी ते सर्व **केशव** सहन करीत. एवढ्या दुःखद यातना हे कशा सहन करितात याचें मोठमोठ्या वैद्यांस देखील फार आश्चर्य वाटे! अशा कष्टप्रद अवस्थेंत देखील **केशव** नेत्र झांकून शांत मुद्रेनें "शिवसुंदर" "शिवसुंदर" असें नामस्मरण करीत, अंथरुणावर स्वस्थ पडत. अशी स्थिति रविवार ता० ६ पर्यंत चालली. परंतु त्या दिवशीं जे क्लेश होऊं लागले ते मात्र त्यांच्यानें

सहन होईनात. यांतून ईश्वरानें सत्वर सोडवावें ह्मणून ते वारंवार देवाचा धांवा करीत आणि क्षणोक्षणीं " बा " आणि " मा " या एकाक्षरी प्रेमळ नामांनीं परमात्म्यास हाका मारीत! त्यांच्या आरोळ्यांनीं तें भव्य राजमंदिर दणाणून जाई! घरचीं माणसें शोकाकुल होऊन गेलीं! " त्यांच्याशीं दोन शब्द बोला ह्मणजे त्यांस धीर येईल " असें कोणसें केशवला ह्मणालें. तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें —" आतां मी त्यांच्याशीं अधिक काय बोलूं? बोललोंच तर वैकुंठाविषयीं बोलणार! पण, त्याच्या योगें तीं अधिकच शोक करितात!" केशवची वृद्ध माता रात्रंदिवस त्यांच्या उशाशीं बसली होती! आईच ती! तिच्या दुःखाची कोण सीमा करील! यातनांनीं परम विव्हल होऊन एकवार केशवनीं आपलें मस्तक आईच्या मांडीवर ठेविलें आणि तिच्या मुखाकडे अवलोकन करून ह्मटलें—"आई, या यातना कां संपत नाहींत?" तेव्हां तिचें हृदय विदीर्ण होऊन तिनें ह्मटलें—" बाळा, काय सांगूं! मज पापिणीच्या पातकांबद्दल हे तुला क्लेश होत आहेत! नाहीं तर तुजसारख्या सुपुत्राला देव अशा यातना कां करिता?" त्यावर केशवनीं ह्मटलें—" नको, नको! आई, असें ह्मणूं नकोस! तुझ्यासारखी सुमाता म-

ला कोठें मिळेल ? माझ्या अंगीं जे कांहीं सद्गुण आहेत ते सर्व तुजपासून प्राप्त झाले आहेत ! माझी प्रेमळ विश्वजननी या सर्व यातना माझ्या बऱ्याकरितांच पाठवीत आहे ! मला या कुशीवरून त्या कुशीवर करून ती मला खेळवीत आहे !" किती अचल भाव हा! कोणींसें पुनः एकदां ह्मटलें—"आपल्या कुटुंबाची कांहीं व्यवस्था करावयाची असल्यास करून घ्या." त्यावर केशवनीं ह्मटलें —"त्यांची व्यवस्था मी काय करणार ? महान् विश्वकुटुंबी परमात्मा त्यांची व्यवस्था करण्यास समर्थ आहे."

अशा यातनांत ता० ७ सोमवार सर्व गेला. मधून मधून केशव निचेष्ट पडत व प्रार्थना करीत. त्यांचे प्रिय शिष्य त्रैलोक्यनाथ सान्यल हे भक्तिपर संगीत गान करीत. या प्रमाणें सोमवारची दोनप्रहर रात्र उलटली. अंतकाल खास समीप आला असें सोमवारपासूनच सर्वांस वाटूं लागलें होतें. आणि पूर्वरात्र उलटून गेल्यावर तर कोणासही आशा राहिली नाहीं. मग काय विचारावें? राजगृहाप्रमाणें तो भव्य वाडा शोकाच्या किंकाळ्यांनीं दाणाणून गेला, सर्व घर व बाहेरील बाग माणसांनीं भरून गेला. सर्वांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहात आहेत. रात्रीचा घनघोर अंधकार नष्ट होऊन प्रातःकालचा कोमल

प्रकाश **केशवच्या** खोलींत पडला. **केशव** बिछान्यावर निचेष्ट पडले होते. त्यांनीं एकवार नेत्र उघडले आणि सर्व शिष्यवर्गाकडे अवलोकन करून पुनः नेत्र झांकिले! त्यासरसे सर्वांनीं ईश्वरस्तोत्र ह्मणण्यास प्रारंभ केला! **केशव** अद्यापि श्वास घेत होते. सूर्य वर येत चालला! नऊ वाजले! तेव्हां त्यांच्या मुखावर दिव्य प्रभा चमकूं लागली! शेवटीं श्वास बंद पडला! जान्युआरी ता० ८ मंगळवार या दिवशीं प्रातःकालीं ९ वाजून ५३ मिनिटांनीं **महात्मा ब्रह्मानंद केशव चंद्र सेन** यांनीं देह ठेविला. त्या कालीं त्या गृहांत जो कांहीं आकांत कोसळला त्याची कल्पना देखील करवत नाहीं.

**साधु केशव** यांची मुद्रा शांत व हास्यवदन होती. त्यांच्या मुखावर विलक्षण प्रकारचें तेज झळकूं लागलें! त्यांची चर्या आनंदभरित दिसत होती! जिवंतपणीं **केशव** ध्यानस्थ झाले ह्मणजे ज्याप्रमाणें त्यांचा मुखचंद्र दिसे त्याप्रमाणें आतांही दिसत होता! हा आनंद इहलोकचा नव्हे! तो साक्षात शाश्वत **ब्रह्मानंद**!



# नव संहिता.

## आवाहन.

### १.

हे अनंतज्ञानपरमात्मन् आपल्या अगाध सामर्थ्यानें ह्या पवित्र आर्यावर्त्तामध्यें आह्मां बंधुभगिनींचा जो नूतन भक्तवृंद तूं स्थापन केला आहेस, त्यास सन्मार्ग दाखवून त्याचें नियमन करण्याकरितां हें नव संहितारूप नियमशास्त्र लिहिण्याची स्फूर्ति ह्या तुझ्या दीन दासास तुझ्याच मंगल इच्छेनें झाली आहे. अतएव हे परमसमर्थ परमेश्वर माझ्या अंतःकरणांत जागृत हो, आणि मला तुझें शाश्वत सत्य शिकीव.

२. प्रत्येक नर आणि नारी ह्यांच्या अंतःकरणपटावर आपलें नियमशास्त्र सुंदर सुवर्णाक्षरांनीं लिही. मेघ-

गर्जनेप्रमाणें गंभीर वाणीनें साऱ्या भारतवर्षभर ह्या शास्त्राचा जयघोष होऊं दे. तूं जो **महान् दैदीप्यमान शास्त्रकार** त्या तुझें वचन तुझ्या सकल बालकांनीं विनम्र भावानें ग्रहण करावें असा अनुग्रह ह्या शास्त्रावर कर.

३. जसा तूं अनंत तसें तुझें शास्त्रही अनंत. तें पुस्तकरूपानें लिहून ठेवितां येत नाहीं. त्यास ग्रंथमर्यादांनीं बद्ध करितां येत नाहीं. यास्तव, मनोदेवतेच्या द्वारें मनुष्यमात्राच्या अंतर्यामीं प्रकट होऊन आमच्या आत्म्यास तूं आपल्या विशुद्ध ज्ञानाचे नित्य पाठ देतोस.

४. महान् महान् यती, मुनी, आणि योगी, यांसच तूं आपला आदेश प्रदान करितोस असें नाहीं. सर्व ठिकाणच्या व सर्व कालच्या संत आणि सेवक जनांस तूं आपली मंगल इच्छा शिकवितोस. तस्मात् हे **ज्ञानमूर्ति,** प्रत्येक विश्वासू भक्ताच्या हृदयमंदिरांत तूं आसनस्थ हो, आणि मनुष्यमात्राचें परम श्रेष्ठ कर्तव्य काय हें सांग; संसारामध्यें कोणत्या रीतीनें वागावें हें शिकीव.

५. **हे सच्चिदानंद हरी,** तूं आमचा गुरु हो. आणि तुझ्या पवित्र **नव विधानाच्या** भक्तवृंदास आपलें **नव संहितारूप** नियमशास्त्र कथन कर.

# गृह.

## १.





ईश्वरभक्ताचें गृह निर्मल असावें. त्यांत सर्व ठिकाणीं स्वच्छता, टापटीप, नीटनेटकेपणा हीं असलीं पाहिजेत. मनुष्याचें गृह परमेश्वराचें वसतिस्थान होय. ह्मणून तें इतकें शुचिर्भूत असलें पाहिजे कीं, तें अवलोकन करितां क्षणींच ह्या स्थलीं साक्षात परमेश्वर नांदतो आहे असा अवलोकन करणाराचा भाव व्हावा.

२. स्वच्छता ही एक प्रकारची पवित्रता होय. ह्मणून खऱ्या भक्तानें जसें आपलें अंतःकरण शुद्ध ठेविलें पाहिजे, त्याचप्रमाणें त्यानें आपलें शरीर व गृह हींही सर्वदां स्वच्छ आणि निर्मल राखिलीं पाहिजेत. असें न केल्यास परमेश्वर त्या ठिकाणीं वास करणार नाहीं.

३. घर आणि घरांतील सर्व सामान ईश्वराच्याच

दयेनें प्राप्त होतें. घराच्या मालकानें आपली सर्व चीजवस्त ही प्रत्यक्ष परमेश्वराची अत्युत्तम देणगी समजून नेहमीं तिचा मंगल उपयोग करावा. तिच्या योगें सकल मानव-कुटुंबाचें ऐहिक आणि पारलौकिक कल्याण होऊन ईश्वराच्या नांवाचा जयजयकार होई अशाच रीतीनें सर्व पदार्थांचा विनिमय करावा.

४. परमेश्वरानें दिलेल्या वस्तू आपणच स्वतः मिळविल्या असें अभिमानानें मानून जो कोणी घरांतील पदार्थांचा व्यय स्वेच्छ रीतीनें विषयोपभोग घेण्यांत करितो त्यास धिक्कार असो.

५. सद्भक्त ज्याप्रमाणें देवाचें पवित्र मंदिर ईश्वरार्पण करितात, त्याचप्रमाणें प्रत्येक गृहस्थानें आपलें गृहमंदिरही मनोभावानें ईश्वरार्पण करावें. आणि वस्त्रप्रावरणें, भांडीं-कुंडीं, व डागडागीने यांनीं मंडित असा आपला संसार ईश्वरास समर्पण करितांना ह्मणावें कीं,—

६. हे परमेश्वरा, तूं आमची गृहदेवता आहेस. हें माझें घर व यांतील सर्व कांहीं मी तुला समर्पण करितों. हें सर्व गृह पवित्र कर, आणि ह्यामध्यें राहाणाऱ्या सर्व मनुष्यांवर आपला मंगल अनुग्रह कर.

७. घरांतील सर्व सामानसुमान स्वच्छ, निर्मल, व निष्कलंक असावें. गृहमंदिरांत घाण, केरकचरा, किंवा कोणत्याही प्रकारची अशुद्धता कोठेंही नसावी.

८. घरांतील प्रत्येक खोली दररोज झाडून सारवून निर्मल ठेवावी. प्रति प्रातःकालीं व सायंकालीं कर्पूर, चंदन, धूप, आदिकरून दुर्गंधनाशक द्रव्यें घरांत जाळावीं. सूर्यप्रकाश व स्वच्छ हवा सर्व घरांत खेळावी.

९. देवास दुर्गंधीचा फार वीट येतो. अव्यवस्था आणि गलिच्छपणा यांचा त्यास फार कंटाळा वाटतो.

१०. उपयुक्तता व सौंदर्य हीं दोन्हीं देवास प्रिय आहेत. ह्मणून भक्ताचें घर निरोगी व हवाशीर असावें इतकेंच केवळ नव्हें तर तें रम्य व प्रेक्षणीय असावें.

११. माझे भक्त ज्या स्थलीं राहातात तें स्थल निर्मल, रमणीय, व आल्हादकारक असावें असें परमेश्वर ह्मणतो.

१२. यास्तव, दररोज सकाळीं घरांतील मुख्य मुख्य स्थलें सुगंधी पुष्पांनीं, सुकोमल पर्णांनीं, व सुंदर वेलींनीं सुशोभित करावीं. अशा ठिकाणीं मनुष्य गेलें असतां त्याच्या चित्तास आनंद व अंतःकरणास आल्हाद व्हावा.

१३. अशा प्रकारचा शुचिर्भूतपणा आणि नीटनेटकेपणा घरांतील सर्व ठिकाणीं असला पाहिजे. ईश्वरभक्तीच्या ठिकाणीं, उठण्या बसण्याच्या जागीं, अभ्यास करण्याच्या किंवा विश्रांति घेण्याच्या ठिकाणीं, मध्य गृहांत, अंतर्गृहांत, सर्वत्र सारखा निर्मल भाव असला पाहिजे.

१४. शयन करण्याचा बिछाना साफ असावा. कपाटांत ठेविलेलीं वस्त्रेंप्रावरणें, ग्रंथसंग्रहांतील ग्रंथ, घरांतील चीजवस्त, स्वयंपाकगृहांतील भांडींकुंडीं हीं सर्व सुंदर रीतीनें रचून ठेवावीं.

१५. साधेल तर प्रत्येक कुटुंबांत दररोजच्या उपासनेचें स्थान निराळें असावें. हें स्थान घरांतील स्त्रियांनीं होईल तितकें रमणीय ठेवावें. ईश्वरभक्तीशिवाय कोणताही अन्य व्यवहार ह्या ठिकाणीं होऊं नये. उपासकाचें व्यासपीठ, भक्तजनांचीं आसनें, धर्मपुस्तकें, आणि संगीतवाद्यें हीं सर्व नित्य पुसून निर्मळ राखावीं.

१६. उपासनास्थानाच्या भिंतींवर सत्वर नजरेस येतील अशा ठिकाणीं बोधपर धर्मवाक्यें डकवावीं. परंतु शोभेकरितां किंवा बोधाकरितां देखील कोणतीही प्रतिमा,

मूर्ति, चित्र, किंवा कसलीही तसबीर, अथवा मूर्त्तिपूजेचें चिन्ह ह्या पवित्र ठिकाणीं ठेवूं नये.

१७. व्यासपीठासमोरच्या भिंतीवर उपासकाच्या सन्मुख खालीं दिलेला अथर्व वेदांतील अत्युत्तम श्लोक भव्य अक्षरांनीं कोरून काढून चिकटवावा—

**श्लोक.**

सहृदयं संमनस्यं अविद्वेशं कृणोमि वः
अन्योन्यं अभिहर्यत वत्सं जातं इवाघ्न्या ।
अनुव्रतः पितुःपित्रो मात्रा भवतु सम्मनः
जायापत्ये मधुमातिं वाचं वदतु शांतिवान् ।
मा भ्राता भ्रातरं द्विषद् मा स्वसारं उत स्वसा
संम्यंचः सव्रतः भूत्वा वाचं वदत भद्रया ॥

**अर्थ**—एक मनानें व एक अंतःकरणानें तुह्मीं राहावें, कोणीं कोणाचा द्वेष करूं नये. नुकेंच जन्मलेलें आपलें वत्स पाहून ज्याप्रमाणें गाईस आनंद होतो त्याप्रमाणें तुह्मीं परस्परावर प्रेम करा. पुत्रानें पित्याची आज्ञा पालन करावी व मातेशीं एक मनानें वागावें. पत्नीनें पतीशीं ऐक्यानें राहून त्याजशीं सर्वदा मधुर भाषण

बोलावें. बंधुभगिनींमध्यें कोणत्याही प्रकारचा द्वेषभाव नसावा. अशा प्रकारें गोड बोलून ऐक्य रक्षण करावें.

१८ तसेंच महानिर्वाण तंत्रांतील खालीं दिलेला श्लोक दुसऱ्या एकाद्या प्रमुख स्थलीं चिकटवावा—

श्लोक.

ब्रह्मनिष्ठोगृहस्थःस्यात् तत्वज्ञानपरायणः ।
यद्यत्कर्म प्रकुर्वीत तत्ब्रह्मणि समर्पयेत् ॥

अर्थ—परमेश्वरास भिऊन चालणारा गृहस्थ तत्वज्ञानाच्या ठायीं सर्वदां रत असतो. तो जें जें कर्म करितो तें परमेश्वराचे ठिकाणीं समर्पण करितो.

१९. अशा प्रकारें जें गृह स्वच्छ, निर्मल, सुनियंत्रित, धर्मपरायण असतें त्या ठिकाणीं साक्षात लक्ष्मी वास करिते. अशा घरांत समृद्धि, आनंद, शांति, आणि परमेशकृपा हीं सर्वदां नांदतात. त्यांत राहाणारे पुरुष, बायकामुलें, नौकरचाकर, गृहसंबंधीं गुरेंढोरें हीं सर्व नेहमीं सुखीं असतात.

२०. अशा पवित्र गृहमंदिरांत ईश्वरनामाचा जो जयघोष होतो त्याच्या योगें तें सर्व गृह दणाणून जातें. अशा मंगलमय गृहांत राहाणारीं स्त्रीपुरुषें धन्य !

# गृहस्थ.

## ३.





प्रत्येक गृहस्थानें प्रतिप्रातःकालीं लवकर उठावें—परंतु फार लवकर अथवा फार उशिरां उठूं नये.

२. साधारण प्रकृतीच्या मनुष्यास सात तासांची निद्रा पुरे आहे. ती पूर्ण झाल्यावर आळशासारखें बिछान्यावर लोळत पडूं नये. सूर्योदयानंतर कधींही निद्रिस्त राहूं नये.

३. प्रभातकालीं उठल्याबरोबर शुचिर्भूत व्हावें. तदनंतर जगत्कर्त्याचें प्रातःस्मरण करावें.

४. उभें राहून किंवा बसून नेत्र निमीलित करून ह्मणावें कीं,—करुणामय प्रभो, सर्व रात्रभर संरक्षण करून तूं आजचा हा दिवस दाखविलास. ही तुझी मजवर मोठी कृपा होय. आजच्या ह्या सर्व दिवसांमध्यें माझ्या

हातून सत्कार्य होईल, पापकर्म होणार नाहीं, अशा रीतीनें मला वागीव.

५. मनुष्याचें मन व शरीर या दोहोंसही व्यायामाची आवश्यकता असते. ह्मणून नित्य प्रातःकालीं किंवा सायंकालीं कोणत्या तरी प्रकारचा शरीरव्यायाम करावा. नित्य नियमानें नियमित व्यायाम केल्यानें शरिराचे स्नायू बळकट होतात, रक्ताभिसरण वाढतें, आणि शरिराचें सामर्थ्य व आरोग्य हीं वृद्धि पावतात.

६. मनुष्याचें शरीर देवाचें वसतिस्थान होय. यास्तव जो कोणी शरिराची अनास्था करितो तो देवाच्या देव्हाऱ्याचा धिःकार करितो.

७. आरोग्यशास्त्राचे नियम ईश्वरानेंच लावून दिले आहेत. अतएव जो कोणी ह्यांचा अतिक्रम करितो तो एक प्रकारचें दैहिक पाप करितो; त्याबद्दल त्याला शासन झाल्यावांचून कदापि राहाणार नाहीं.

८. ईश्वराचे खरे भक्त असतात ते लहानमोठ्या सर्व कामांत ईश्वराची सेवा करितात; आणि दैहिक किंवा आत्मिक, शरीरसंबंधीं किवा आत्म्याच्या संबंधीं जे कांहीं नियम असतील ते सर्व लक्ष्यपूर्वक पाळितात.

९. व्यायाम करून आल्यावर नित्याचीं वर्त्तमानपत्रें वगैरे कांहीं असल्यास त्यांचें अवलोकन करावें, व जरुरीचें कांहीं काम असल्यास तें आटोपून ध्यावें. तदनंतर सुस्नात व्हावें.

१०. नित्य स्नान करावें; कधीं कधीं नदीच्या किंवा तळ्याच्या पाण्यांत स्नान करावें. अशी सोय नसल्यास दररोज आपल्या घरींच स्नान करावें. स्नानाशिवाय मन पवित्र राहात नाहीं.

११. स्नानाचें पाणी निर्मल आणि आरोग्यदायक असावें. तें तसें नसल्यास स्नानाच्या योगें हित होण्याचे ऐवजीं अनहित मात्र होईल.

१२. साबणानें किंवा दुसऱ्या एकाद्या मलहारक द्रव्यानें शरीर घांसून स्वच्छ करावें. कारण शरिराची बाह्यशुद्धि झाल्यावांचून चित्ताची अंतर्शुद्धि होत नाहीं.

१३. मस्तकास स्निग्ध, शीतल तेल लावून, नंतर थंड पाण्यानें मस्तक व सर्व शरीर धुऊन काढावें. अशानें शरिराचे श्रम हरण होऊन चित्त शांत होतें.

१४. अशा प्रकारच्या अभ्यंगस्नानानें द्विगुणित हित होतें. त्याच्या योगें शरिरावरील मळ नाहींसा होऊन

मनाचा सर्व संताप हरण होतो, चित्ताची शुद्धि होते, व अंतःकरणास आराम वाटतो.

१५. स्नानविधी हा जसा शरीरसंस्कार आहे तसाच मनसंस्कारही आहे. यास्तव स्नानकर्म हें मोठें पवित्र कर्म समजलें पाहिजे.

१६. जसें आपलें उपासनास्थान. पवित्र तसेंच स्नानाचेंही ठिकाण पवित्र समजलें पाहिजे. येथेंही सर्वत्र निर्मल भाव असावा.

१७. निर्मल जल अत्यंतादरणीय समजा, आणि त्यांत अवगाहन करून शरीर शुद्ध करीत असतां अंतःकरणही पवित्र करा. ब्रह्मसागरांत आत्म्यास सुस्नात करून त्याचाही पापमल धुऊन काढा.

१८. पवित्र उदक ही विश्वजननीची साक्षात् कृपा समजा. तिच्या द्वारें ती कारुणिक माता आपल्या प्रिय बालकांस पावन करण्यास अवतीर्ण होते.

१९. आपल्या थोर पूर्वजांनीं ह्याविषयीं काय ह्मटलें आहे त्याकडे लक्ष्य द्या.—

श्लोक.

आपो अस्मान मातरः शुद्धयंतु ।

विश्वंहि रिप्रं प्रवहंति
देविः उद इद आभ्यः शुचिरापः ऐमि ॥

ऋग्वेद.

**अर्थ.**— ही सलिलरूपी आमची जननी आह्मांस पवित्र करो! ही जननी सर्व मल दूर करिते. हिच्या पवित्र स्पर्शानें मी शुद्ध व निर्मल होतों.

२०. स्नानसमयीं भक्तानें ईश्वराजवळ हेंच मागावें.



# नित्याची उपासना.

## ४.

स्नान झाल्यानंतर ईश्वरोपासनेस योग्य अशीं स्वच्छ वस्त्रें परिधान करावीं.

२. कारण अंगावर मळकट वस्त्रें असल्यास चित्तामध्यें मंगल विचार येत नाहींत. असें झालें ह्मणजे अर्थात आत्म्याची अवस्था उन्नत होत नाहीं.

३. ह्यासाठीं, उपासनास्थानीं ईश्वरासमोर जावयाचें तें स्वच्छ वस्त्रें परिधान केल्याशिवाय जाऊं नये.

४. उपासनागृहांत गेल्यावर प्रत्येकानें आपापल्या आसनावर नित्याच्या नियमित स्थलीं बसावें. भलत्याच ठिकाणीं पाहिजे त्याच्या असनावर कधींही बसूं नये.

५. ज्या आसनावर बसून आपण ईश्वरभक्ति करितों

त्यास आपला मोठा मित्र समजून फार काळजीनें त्यास जतन करावें. कोठें प्रवासास गेल्यास तें बरोबर न्यावें.

६. पतिपत्नी, बंधुभगिनी, नौकरचाकर इत्यादि कुटुंबांतील सर्व माणसांनीं उपासनेच्या वेळीं एकत्र व्हावें, आणि आपापल्या आसनावर बसावें.

७. बाहेरून मित्र किंवा पाहुणे उपासनेस आलेले असतील तर सर्व पुरुषांनीं एका बाजूस आणि स्त्रियांनीं त्यांच्या समोर दुसऱ्या बाजूस बसावें.

८. आपल्या आसनावर बसल्यावर प्रत्येक पुरुषानें व स्त्रीनें ईश्वरास नमस्कार करावा.

९. कुटुंबांतील सर्व माणसें येऊन बसल्यानंतर घरांतील यजमानानें व्यासपीठावर बसावें आणि उपासनेस प्रारंभ करावा. उपासना साधी परंतु गंभीर व कुटुंबांतील सर्व माणसांस सहज समजे अशी असावी.

१०. प्रथमतः एक पद्य गावें. नंतर आवाहन करावें. त्यांत आपली भक्ति सद्भावपूर्वक होई असा परमेश्वरानें सर्वांवर अनुग्रह करावा असें त्याजजवळ मागावें. तदनंतर पुनः एक गीत गावें. पद्यें गावयाचीं तीं स्त्रीपुरुषांनीं मिळून मोठ्या प्रेमानें व सुस्वर सुरावर गावीं.

११. नंतर ईश्वरस्तव करावा. ह्यामध्यें उपासकानें ईश्वराच्या गुणांचें वर्णन करावें. परमेश्वर सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप, अनंतरूप, आनंदमय, अमृतधाम आहे; तो सर्वज्ञ, सर्वशक्ति, असा असूनही अतिकारुणिक, प्रेममय आहे; तो भक्तवत्सल, शांतिधाम, पतितपावन, पापविमोचन आहे, अशा प्रकारें त्याच्या मंगल गुणांचें वर्णन करून त्याची स्तुति करावी.

१२. ह्यानंतर ध्यान करावें. ध्यान करितांना सकल चित्तवृत्ति एकाग्र करून परमेश्वराच्या गुणांचें चिंतन करावें आणि त्याचें मंगलमय स्वरूप हृदयाचे ठायीं अवलोकन करावें. ध्यानस्थ असतांनां सर्व भक्तजनांनीं अल्पकालपर्यंत निश्चल व स्तब्ध राहावें.

१३. हृदयमंदिरांत परमेश्वराचें दर्शन घेतल्यावर सर्वांनीं मिळून एकत्र ह्मणण्याची नेहमींची अल्प प्रार्थना ह्मणावी. ही प्रार्थना ठरीव असते. ती संपल्यावर दररोज एकानें ह्याप्रमाणें पाळीपाळीनें प्रत्येक जणानें व्यक्तिविशेष प्रार्थना करावी. तिच्या द्वारें स्वतहाची दुर्बलता ईश्वरास विदित करावी व कृतपातकांबद्दल अनुतापबुद्धीनें त्याची क्षमा भाकावी.

१४. ह्यानंतर पुनः सर्वांनीं मिळून ईश्वराचें स्तोत्र ह्मणावें. त्यांत ईश्वराच्या नामांचा उच्चार करावा. सद्भक्तांस ईश्वरनामासारखें मधुर व पातकापासून पावन करणारें दुसरें कांहीं नाहीं. नामोच्चारण झालें ह्मणजे मग पद्यद्वारां ईश्वराचें यश गावें.

१५. इतकें झाल्यावर उपासक यजमानानें धर्मपुस्तकांतून कांहीं धर्मवचनें वाचून त्यांचा संक्षिप्त अर्थ सांगावा. तो सांगतांना तीं धर्मवचनें ज्या महापुरुषांचीं असतील त्यांचें ज्ञान, भक्ति, वैराग्य ह्यांविषयीं कथन करावें.

१६. शास्त्रवाचन झाल्यानंतर उपासकानें त्या दिवसाची मुख्य प्रार्थना करावी. ती शांत, गंभीर, प्रेमळ, व भक्तिभावानें परिपूर्ण असावी.

१७. प्रार्थनेमध्यें आत्म्याच्या खऱ्या भावाना उदित झाल्या पाहिजेत. दररोज अंतःकरणांत जे कांहीं उद्गार उत्पन्न होतील ते प्रार्थनेच्या द्वारें सुकुमार सुवासिक पुष्पांप्रमाणें ईश्वरास समर्पण करावे.

१८. व्यर्थ बडबड ईश्वरास आवडत नाहीं. अंगविक्षेप करणें, हेल काढणें, ठरीव शब्दांची पुनरावृत्ति करणें, नसती नम्रता आंगीं आणणें इ० गोष्टींचा परमेश्वरास

वीट येतो. ह्यांच्यायोगें प्रार्थना सहसा सफल होत नाहीं.

१९. यास्तव, कुटुंबांतील नित्याची उपासना साधी व अंतःकरणपूर्वक असावी. त्या प्रसंगीं सर्वांनीं आपापल्या अंतस्थ मनोभावना ईश्वरास निवेदन कराव्या.

२०. अशा रीतीनें परमेश्वराजवळ जे कोणीं मागतात त्यांची याचना कधींही निष्फल होणार नाहीं. त्यांस ईश्वरप्रसाद मिळाल्यावांचून राहाणार नाहीं. दीन अंतःकरणानें जे कोणीं त्याचा करुणा भाकितात त्यांस शांति, आराम, आनंद इ० प्रदान करण्यास प्रभु समर्थ आहे.

२१. भक्तवत्सल प्रभु आपल्या भक्तांस कालत्रयींही निराश करणार नाहीं. तो दीनांच्या हांकेस कान देतो; दुर्बलांस सहाय्य करण्यास मागें पुढें पाहात नाहीं. सर्वभरिभार त्याजवर टाकून शांत चित्तानें आपण धीर मात्र धरिला पाहिजे.

२२. यास्तव सद्भक्तांनीं विश्वासू अंतःकरणानें धीर धरावा. योग्य कालीं आपल्या अनंत भांडारांतून दया, क्षमा, ज्ञान, पवित्रता इत्यादि आत्मिक रत्नें सर्वसमर्थ प्रभु आपल्या भक्तांस दिल्यावांचून राहाणार नाहीं. मात्र विश्वास दृढ केला पाहिजे.

२३. ह्याप्रमाणें प्रति प्रातःकालीं ईश्वरभक्ति करावी. तिच्या योगें सद्भक्तांचे अंतरात्मे शाश्वतानंदाचा उपभोग करून सदा संतुष्ट असतात, संसारसंकटांपासून होणारी व्यथा दूर होते, व चित्ताचा सर्व संताप शमन होतो.

२४. आशीर्वचन मागितल्यावर सर्वांनीं उभें राहून आरती ह्मणावी. तदनंतर मस्तक नम्र करून परमेश्वरास त्रिवार नमस्कार करावा.

२५. शेवटीं आनंदभरित अंतःकरणानें—शांतिः शांतिः शांतिः—असें त्रिवार ह्मणावें.



# नित्याचें भोजन.

## ५.





विचारशून्य पशू देवाची आठवण केल्याशिवाय आपलें अन्न खातात. तर जे कोणी देवाचें नांव घेतल्या शिवाय भोजन कारितात तेही पशुवत नव्हे-त काय? गाय, बैल, घोडा इ० ग्राम्य पशू, किंवा सिंह, व्याघ्र, लांडगा इ० वनपशु शरीरपुष्टीकरितां आ-पापलें खाद्य खातात. तसेंच जर मनुष्य प्राणीही आपलें अन्न केवळ शरीर पोसण्याकरितांच खाईल तर तोही पशूच्याच पंक्तीला जाऊन बसेल. अशा मनुष्यास नर-पशु हीच संज्ञा योग्य.

२. खरोखर अशा रीतीनें उदरभरण करणारीं मनुष्यें पशुवृत्तीचींच यांत संशय नाहीं. धार्मिक मनुष्यें ह्या प्रकारें कधींही अन्न ग्रहण करीत नाहींत.

३. आपल्या दररोजच्या अन्नपाण्यामध्यें ईश्वरकृपा अनुभवून जे कोणीं अन्नग्रहण करितात व जल प्राशन करितात ते धन्य!

४. ह्या जड देहाच्या पोषणार्थ साक्षात ईश्वरच आपणास अन्नपाणी पुरवितो. यास्तव, त्याचें नामस्मरण करून जे कोणीं त्याच्या देणगीचा स्वीकार करितात ते पातकापासून मुक्त होतात.

५. उदरंभरू लोक खाणेंपिणें व मजा मारणें ह्यांत आपलें आयुष्य दवडितात; आणि शेवटीं आपला नाश करून घेतात. तुह्मीं त्यांच्यासारखें होऊं नका.

६. तुमचें भोजनगृह खाऊन पिऊन मजा मारण्याचें ठिकाण नव्हें, तर परमेश्वरानें दिलेलें हें शरीर त्याच्याच कृपेनें प्राप्त होणाऱ्या अन्नमय शक्तीनें संरक्षण करण्याचें पवित्रस्थान असें तुह्मी समजा.

७. स्नानसंस्काराच्या योगें शरीरशुद्धीबरोबर जशी चित्तशुद्धि झाली पाहिजे, तद्वत अन्नसंस्काराच्या योगेंही जड शरीर पोषणाबरोबर अंतरात्म्याचेंही पोषण झालें पाहिजे.

८. शास्त्रवचनही असेंच आहे.—

### श्लोक.

अश्नीथ वाथ पिबथ कुरुथ वाथ यत्ततः
यूयं कुरुत तत्सर्वं महिम्ने परमेशितुः।

अर्थ.— खाणें, पिणें, किंवा दुसरें जें कांहीं कार्य तुह्मीं करितां तें सर्व परमेश्वराप्रीत्यर्थ करा.

९. नित्याची प्रातरोपासना झाल्यावर यजमान आणि कुटुंबांतील दुसरीं माणसें ह्या सर्वांनीं भोजनगृहांत एकत्र व्हावें. त्या वेळीं प्रत्येकानें वरील वचन पूर्णपणें ध्यानांत बाळगावें.

१०. आपापल्या जागीं बसल्यावर सर्वांनीं **अन्नदायिनी विश्वजननीस** नमस्कार करावा. नंतर पात्रें वाढिल्यावर यजमानानें प्रार्थना करावी.—

११. हे **आनंददायिनी जननी**, हें अन्न पवित्र कर. ह्याजपासून आमच्या शरिरांत दिव्य सत्व उत्पन्न होऊं दे. ह्या अन्नपाण्यापासून आमच्या मनांत सदैव मंगल विचार येतील असा आह्मांवर अनुग्रह कर.

१२. परमेश्वराच्या नामस्मरणानें पावन न झालेलें अन्नजल तुह्मी भक्षण अथवा प्राशन करूं नका.

१३. भोजनकालीं नुस्तें ईश्वरनामस्मरण करावें इ-

तर्केंच केवळ नाहीं, तर शरीरपोषण करणारी जी ही अन्नमय शक्ति तिच्या ठायीं सकल जगताची आदिशक्ति तिचें प्रतिबिंब अनुभविलें पाहिजे.

१४. अन्नामध्यें सद्भक्तांस आपल्या प्रभूची मूर्ति दिसली पाहिजे.

१५. मिष्टान्न भोजनानें जसें हें बाह्य शरीर पुष्ट होतें, तसाच मनुष्याचा अंतरात्माही प्रेम, भक्ति, पवित्रता इत्यादिक आत्मिक पक्वान्नांनीं संतृप्त झाला पाहिजे. ह्या आत्मिक भोजनाशिवाय मिष्टान्न भोजनाची सार्थकता होत नाहीं.

१६. ह्याप्रमाणें सद्भक्तांच्या घरीं सकाळीं व संध्याकाळीं दोन्ही वेळीं भोजनविधी अत्यंत पवित्र मानिला जावा.

१७. मोठमोठे संत महंत ह्याचप्रमाणें भोजन करीत असत. ह्मणून धार्मिक मनुष्यांनींही त्यांचाच कित्ता घ्यावा.

१८. तुमचें अन्न आरोग्यदायक व शक्तिवर्धक असावें.

१९. भोजनाकरितां पैशाची उधळपट्टी करूं नये. त्याजप्रीत्यर्थ आपल्या प्राप्तीहून अधिक खर्च करूं नका.

२० दारूनें स्वतह्याची कीर्ति, पैसा, प्राण, आणि आत्मा यांचा नाश होतो, ह्मणून तिचें सेवन करूं नका. मद्यासारखें दुसरें कालकूट विष नाहीं. यासाठीं त्यास स्पर्शही करूं नका.

२१. ज्या पदार्थांच्या सेवनानें मनुष्य विचारभ्रष्ट होऊन त्याच्या मनाची प्रवृत्ति पातकाकडे होते त्यांपासून मोठ्या सावधगिरीनें दूर राहा.

२२. विशेष धर्मसाधनाप्रीत्यर्थ ज्यांनीं एकादें व्रत आरंभिलें असेल त्यांनीं मांसाहार करूं नये. मांस भक्षण करितात त्यांच्या हातून मनोनिग्रह किंवा इंद्रियदमन व्हावें तसें होत नाहीं.

२३. नित्याचें अन्न पौष्टिक असून साधें असावें.

२४. शरिरास अपकार करणारे पदार्थ कितीही मधुर किंवा रुचकर लागले तरी ते सेवन करूं नयेत. त्यांपासून देहांत भयंकर रोग होतात.

२५. कुटुंबांतील प्रत्येक मनुष्यानें कोणत्या प्रकारचें अन्न खावें आणि तें किती खावें या गोष्टी ज्याच्या त्याच्या वयाच्या व प्रकृतीच्या मानानें ठरवाव्या.

२६. अन्न सत्वशील असावें—निस्सत्व कधींही असूं

नये. भोजनास रुची यावी व चित्तास समाधान वाटावें एतदर्थ नित्याच्या अन्नांत वारंवार पालट करावा.

२७. आज भोजनास काय काय पदार्थ करावयाचे हें ठरविण्याचें काम गृहिणीचें होय.

२८. वैद्य हा शरीरारोग्याचा गुरू होय. एतदर्थ, कोणचे पदार्थ खावे व कोणचे वर्ज करावे, हें वैद्यानें ठरवावें. वैद्य हा एका अर्थानें देवाचा प्रतिनिधी आहे. त्याची आज्ञा उल्लंघन करण्याचा अधिकार कोणासही नाहीं.

२९. भोजनकालीं मनाची वृत्ति खिन्न, उदास, अथवा दुःखी असूं नये—उल्हासित, आनंदभरित, आणि संतुष्ट अशी असावी.

३०. जेवतांना मधून मधून उपयुक्त संभाषण, चालू विषयांची चर्चा, सभ्य विनोद ह्याही गोष्टी असाव्यात. ह्यांच्या योगें चित्त सुप्रसन्न राहातें. आपल्या मुलांस ह्याप्रमाणें भोजन करितांना पाहून जगन्माता आनंद पावते.



# कामधंदा.

## ६.



सकाळचें भोजन झाल्यावर अमळ विश्रांती घ्यावी व नंतर आपल्या कामावर जावें.

२. कोणी वेतन घेऊन दुसऱ्याची चाकरी करणारा असो, कीं स्वतंत्र व्यापारधंदा करणारा असो, त्यानें आपल्या कामावर नियमित वेळीं हजर राहावें.

३. कारण, कोणतेंही काम नियमित वेळीं केल्याशिवाय त्यांत यश येत नाहीं. जे कोणी या नियमाचें उल्लंघन करितात ते आपल्या खरेपणास जागत नाहींत असें होतें. ह्यास्तव नियमितपणाचा अतिक्रम करणारे लोक ईश्वराचे मोठे दोषी समजले पाहिजेत.

४. नित्याच्या कामास सुरवात करण्यापूर्वीं ईश्वराचें सहाय्य मागावें.

५. प्रत्येक मनुष्याच्या कामकाजांत नानाप्रकारचे मोह, संकटें, अडचणी, व अरिष्टें असतात. त्यांच्याशीं झगडून त्यांवर जय मिळविणें हें काम विश्वासू भक्ताशिवाय इतरांस शक्य नाहीं.

६. ज्या प्रपंचसागरांत नित्यशः मोठमोठ्या मानी पुरुषांची जीवननौका मोहरूपी खडकांवर आदळून नाश पावत आहे, त्या अफाट महासागरांत साधारण दुर्बळांचा काय पाड! यास्तव, सत्वर सकल अभिमान सोडा आणि आपल्या जीवननौकेचें सुकाणू परमेश्वराच्या हातीं द्या. तोच तुह्मांला पैल तीरीं घेऊन जाईल.

७. शेतकी अथवा व्यापार, अर्थशास्त्र, वैद्यशास्त्र, न्यायशास्त्र, किंवा यंत्रशास्त्र, तसेंच शिक्षण, अध्यापन, अथवा संगीत वगैरे कला, अनंतज्ञानपरमात्म्याहून आह्मां अल्पबुद्धि मानवाला अधिक अवगतात असें तुह्मीं समजतां काय? प्रपंच करणें किंवा संसार चालविणें ह्या कामांत ज्ञाननिधी परमेश्वरापेक्षां आपण अधिक प्रवीण आहों असें तुह्मांस वाटतें काय?

८. सुख अथवा संपत्ति ईश्वर कृपेवांचून कशी

प्राप्त होईल? प्रभुप्रसादावांचून एका कवडीचाही लाभ होत नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा.

९. सद्भक्तांनों, अभिमान ही नास्तिकतेची भुरळ आहे असें पक्कें समजा. तिचा सत्वर परित्याग करा. ईश्वरप्रसाद मागितल्याशिवाय प्रपंचकृत्यांस लागाल तर तुमच्या धंद्यारोजगारांत तुह्मांस कदापि यश न येतां, या स्वार्थाच्या पायीं धनलोभाच्या योगें नानाप्रकारचीं घोर पातकें करून ऐहिक व पारलौकिक सुखास मात्र मुकाल, हें पूर्णपणें ध्यानांत बाळगा.

१०. लहान मोठ्या सर्व कार्यांत आपला सगळा मार सर्वसत्ताधीश प्रभूवर टाका. ज्ञान आणि सामर्थ्य देण्यास तोच समर्थ आहे. कठिण प्रसंगीं त्यासच सल्लामसलत विचारा.

११. संकटकालीं काय करावें व कसें वागावें हें तो भक्तवत्सल प्रभूच तूह्मांस सांगेल. तो वत्सल पिता तुह्मांस आपत्कालीं कधींही अंतर देणार नाहीं.

१२. तुह्मीं कोणतेंही काम करीत असां, कोणाचीही चाकरी तुह्मीं पतकरिली असली तरी सर्वश्रेष्ठ प्रभु तुमच्या शिरावर तुमचा धनी आहे व तुह्मी त्याचे सेवक

आहां, तुह्मांस त्याची आज्ञा पाळिली पाहिजे, हें विसरूं नका.

१३. तुह्मीं घरांत बसून सावकारी, अथवा बाजारांत दुकानदारी करीत असां. तुमची चाकरी, उदीम व्यापाऱ्याच्या पेढीवर असो किंवा राजदरबारीं मोठ्या हुद्याच्या जागीं असो, तुह्मीं साक्षात परमेश्वराची पवित्र सेवा करीत आहां, सर्वकाल त्याच्या नजरेखालीं काम करीत आहां, हा भाव सदैव जागृत ठेवा.

१४. तुमचा कामधंदा व तो करण्याचें ठिकाण हीं दोन्हीं जशीं पवित्र आहेत, तशींच तुमचीं काम करण्याचीं हत्यारें हींही पवित्र आहेत. त्यांचा दुरुपयोग करूं नका.

१५. राजाचें राजवेत्र, शस्त्रवैद्याचीं तीक्ष्ण शस्त्रें, वैद्याचें नलिकायंत्र, कारकुनाची दऊतलेखणी, सुताराची वांकसाकिकरें, लोहाराची घणऐरण, शेतकऱ्याचा विळानांगर इ० सर्व ज्याच्या त्याच्या व्यवसायाचीं परम पवित्र उपकरणीं होत. हीं ईश्वराप्रत अर्पण करून त्याच्या सेवेंत झिजविलीं पाहिजेत. त्याच्या पवित्र पदस्पर्शानें तीं पावन होतात. जे कोणी त्यांचा दुरुपयोग क-

रीत नाहींत—सर्वदां योग्यकार्यास लावून त्यांचा सदुपयोग करितात—तेच आपल्या **श्रेष्ठ धन्याचे** इमानी चाकर. अशांसच प्रभु प्रसन्न होतो. अतएव हेच सेवक धन्य!

१६. ह्या **धन्याची** चाकरी बजावण्याच्या कामीं हयगय करूं नका, त्यानें नेमून दिलेलें काम संतुष्ट मनानें, इमानें इतबारें, उद्योगपूर्वक करण्यास तत्पर राहा.

१७. ह्या **धनिश्रेष्ठाच्या** सेवेंत जे कोणी कसूर करितात, आपल्या कर्तव्याचा भाग पूर्णपणें करीत नाहींत,ते आलस्यदोषाच्या शिक्षेस पात्र होतात. अलस्याचें शासन उपवास. जो कोणी उद्योग करितो त्यास मात्र पोटभर खाण्याचा अधिकार आहे; जो निरुद्योगी मनुष्य पोटभर खातो तो आपल्या **धन्याचें** अन्न चोरितो. अर्थात तो चौरकर्म आचरितो.

१८. चार दिवस जिवाविशेष काम करावयाचें आणि आठ दिवस यथेच्छ झोंप घ्यावयाची अशा अनियमित रीतीनें विश्वासू सेवकानें काम करूं नये. अव्याहत रीतीनें प्रतिदिनीं निदान सात तास तरी त्यानें अखंड श्रम करावे.

१९. रोज आपण कसें वागतों, किती काम करितों,

आपणास दिलेल्या शरिरिक व मानासिक शक्तींचा उपयोग कसा व कितपत करितों, याचा पूर्ण हिशेब आपणापैकीं प्रत्येकास ईश्वरापाशीं खास द्यावा लागेल.

२०. कुटुंबपोषणासाठीं करावयाचा व्यवसाय तो नेहमीं मोठा आवडता व आनंददायक असाच असतो असें नाहीं. तरी त्यास कंटाळतां कामा नये. त्याचे योगें चित्त उद्विग्न होऊं देऊं नये. कितीही त्रास व संताप झाला तरी चित्त शांत व संतुष्ट राखिलें पाहिजे.

२१. कामधंदा करीत असतां चित्त चंचल होऊन लोभ, मोह, मद, मत्सर इ० मनोविकार कधीं प्रबल झाले, अथवा द्रव्यप्राप्तीस्तव पापकर्म करण्याचा मोह झाला, तर तत्काल त्या शांतिधामपरमेश्वराकडे धांव ध्या. आणि—"प्रभो माझें रक्षण कर, पापमोहापासून मला राख, द्रव्यलोभापासून मला सोडीव, व ह्या प्रसंगीं मला स्वाधीन ठेव," असें ह्मणून त्याची करुणा भाका.

२२. निरंतर उद्योग करण्यासाठींच आपणास जन्म दिला आहे; ह्मणून सदैव संतुष्ट अंतःकरणानें श्रम करा. जे कोणी आनंदानें कष्ट करितात ते ज्ञान, आरोग्य, पवित्रता हीं प्राप्त करून घेऊन इहपरलोकीं सुखी होतील.

२३. विश्वासपूर्वक कष्ट करणें ही ईश्वराची श्रेष्ठ उपासना होय. जे कोणी आपल्या शक्तीचा अशा रीतीनें उपयोग करितात ते विश्वाच्या **आदिशक्तीची** उत्तम भक्ति करितात. त्या अनंतशक्तिविश्वनायकाच्या प्रबल इच्छास्त्रोतामध्यें आपली इच्छा विसरून जाऊन अंतीं त्याच्या असीम सत्तासागरांत आपलें जीवन सुस्नात करितात ते उत्तम प्रकारचें योगसाधन करितात. धन्य त्यांचें जीवन! धन्य त्यांचें सुचरित्र!!

२४. आपला नित्यव्यवसाय मोठ्या जुलूमाचें काम आहे असें समजून असंतुष्ट मनानें कामावर जातात, व तें करीत असतांना ईश्वरस्मरण करीत नाहींत, आणि सायंकाळीं त्रासून व कंटाळून घरीं येतात ते नास्तिक होत.

२५. आस्तिक भक्त सायंकाळीं आपल्या कामावरून स्वगृहीं परत येतांना त्यांचीं अंतःकरणें उल्हासित वृत्तीनें व उपकारबुद्धीनें विशेष आनंदभरित असतात. त्यांचा आत्मिक आनंद त्यांच्या मुखावर खेळत असतो. असे सद्भक्त प्रभूचे खरे सेवक! धन्य त्यांची प्रभुसेवा!!



# करमणूक.

## ७.

नित्याचें काम आटोपल्यावर मनोरंजनार्थ सायंकाळीं कांहीं तरी करमणूक असावी. ती साधी, आणि निर्दोष अशी मात्र असली पाहिजे.

२. श्रम आणि विश्रांति, काम आणि करमणूक हीं दोन्हीं ईश्वरानेंच लावून दिलेलीं, अतएव पवित्र आहेत.

३. सर्वसत्ताधीश प्रभु आपल्या प्रत्येक सेवकापासून परिपूर्ण मानानें काम करून घेतो, आणि नंतर त्याच मानानें प्रत्येकास आनंदही देतो. स्त्रीपुरुषें, मुलेंलेंकरें ह्या सर्वांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यानें करमणुकीचे मार्ग लावून दिले आहेत.

४. कर्त्तव्याची अनास्था करून जे कोणी आपला

सर्व काल मौजमजेंत दवडितात ते जसे दोषास पात्र, तसेच जे कोणी विश्रांति घेतल्याशिवाय व मनास करमणूक केल्याशिवाय अखंड एकसारखे कष्ट कारितात तेही दोषास पात्र होत. अशा लोकांनीं निरंतर स्मशानवास पतकारिला आहे व आपलें जीवन अखंड शोकाकुल करून घेतलें आहे, असें ह्मणण्यास चिंता नाहीं.

५. स्वर्गांत शोकाचें नांवही नाहीं; कारण परमेश्वर क्रूर, निर्दय, पाषणहृदयी असा धनी नाहीं.

६. सर्वदां निरानंद राहाणें ह्यांत कोठची पवित्रता ? सर्व काल दुःख करणें ह्यांत कोठची मोक्षप्राप्ति ?

७. कामाचे वेळीं काम व आनंदाचे वेळीं आनंद करा, अशी ईश्वरी आज्ञा आहे.

८. उद्योग ही जशी **आदिशक्तीची** पूजा, तशीच करमणूक हीही त्या **आनंदस्वरूपाची** आराधना होय.

९. सद्भक्तांनों, जसा प्रभु काम कारितो व आनंद कारितो तसे तुह्मींही श्रम करा व तदनंतर विश्रांति घ्या.

१०. प्रभूच्या शक्तीनें ज्यांस काम करण्याचें सामर्थ्य येतें व ज्यांच्या ठायीं त्याचा शाश्वत आनंद वास कारितो ते धन्य !

११. मनोरंजनार्थ नानाप्रकारची करमणूक करून घेत असतां तुमचें मुखकमल स्वर्गीय आनंदानें प्रफुल्लित आणि तेजःपुंज दिसलें पाहिजे.

१२. कोणत्याही आनंदाची अथवा सुखसंभोगाची परमावधि हितकर होत नाहीं. तिच्या योगें मनुष्याचें चित्त भ्रष्ट होऊन त्याच्या आत्म्याच्या ठायीं लघुता व विषयासक्ति उत्पन्न होतात.

१३. विषयी जन स्त्रीसमागम व मदिरापान ह्यांच्या द्वारें सुखप्राप्तीची इच्छा धरितात, परंतु ते लवकरच फसतात. असले हजारों लोक नित्यशः दुर्व्यसनांच्या भोंवऱ्यांत सांपडून आपल्या सर्वस्वाचा नाश करून घेतात.

१४. नाशाच्या ह्या साधनद्वयापासून सुज्ञ जन सर्व प्रकारें दूर राहातात.

१५. व्यभिचार आणि मदिरापान ह्यांसारखा पृथ्वीवर दुसरा जिवंत नरक नाहीं. ह्या रौरव नरकांत वास्तव्य करणारे दुष्ट जन जातिभ्रष्ट झालेले मानवराक्षस असें समजून त्यांच्या वाऱ्यासही उभें राहूं नये. त्यांचा श्वासोच्छ्वास ह्मणजे मूर्तिमंत कालकूट विष! त्यांचा स्पर्श ह्मणजे नारकीय भ्रष्टाकार!!

१६. जारिणी स्त्रीच्या समागमानें सुख प्राप्त करून घेण्याची, अथवा तिच्या मुखावलोकनानें आनंद प्राप्त करून घेण्याची, दुष्ट इच्छा ज्याच्या मनांत उद्भवली त्यास मृत्यूनें घेरिलें ह्मणून समजा !

१७. अविचारी व अल्पानुभवी तरुण गृहस्थ करितात त्याप्रमाणें तुह्मी ऐषआरामी, विलासी, व थिल्लर अशा स्त्रियांशीं विशेष संभाषण, सहवास, अथवा हास्यविनोद सहसा करूं नका. अशा प्रकारच्या थट्टामस्करीनें मनाची प्रवृत्ति पातकाकडे होण्यास विलंब लागत नाहीं.

१८. द्यूत अथवा जुगार खेळूं नका. त्याच्या योगें नाश आणि विपत्ति ओढवतात.

१९. नित्य कोणत्या प्रकारची करमणूक करावी व तिजमध्यें किती काल घालवावा हें प्रत्यक्ष प्रभूसच विचारा. आपल्या स्वतःच्या विचारावर विश्वास ठेवून आत्म्याची हानि करून घेऊं नका.

२०. शरिरास व मनास हितकर असेच खेळ खेळा. मात्र हे खेळ निर्दोष असावेत.

२१. असे खेळ अनेक आहेत. एकच खेळ खेळून मनास कंटाळा न यावा ह्मणून नित्य नवा खेळ खेळावा.

२२. सर्व करमणुकींत गायनासारखी अतिश्रेष्ठ करमणूक नाहीं. उत्तम गायन इहलोकीं स्वर्गसुखाचा अनुभव देतें.

२३. गाण्याच्या योगें श्रमाचा परिहार होतो, दुःखाचा विसर पडतो, चिंता दूर होते, मनोविकारांचें दमन होतें, मोहाशीं झगडण्याचें सामर्थ्य येतें, अंतरात्म्यास आनंद होतो, आणि मनुष्य अधिकाधिक भक्तिमान होतें.

२४. अपवित्र, अनीतिमान, विषयी अशा नीच कामांकडे गाण्यास लावून गायनकलेचा दुरुपयोग करितात त्यांस धिःकार असो. मनाच्या नीच प्रवृत्ति वाढवून मनुष्यांस मदोन्मत्त करणाऱ्या गायनापासून ज्यांस आनंद वाटतो, कपटपटु वेश्या स्त्रियांच्या हावभावयुक्त गायनानें ज्यांचें चित्त तल्लीन होतें, ते आपल्या आणि दुसऱ्यांच्याही आत्म्याचा नाश करून घेतात.

२५. शुद्ध आणि पवित्र गायन मानवी नव्हे, दैवी आहे. सतार, मृदंग, बीन, वीणा इ० गायनवाद्यांच्या मधुर सुरांचे ठायीं **आनंददायिनी विश्वमोहिनी जगज्जननी** वास करिते. ज्या गायनांत तिचें वास्तव्य नाहीं तें कितीही सुस्वर असलें व मधुर वाटलें तरी तें अमंगल समजावें. त्यापासून खरा आनंद प्राप्त होत नाहीं.

२६. गायन आणि गायनवाद्यें सद्भक्तानें पवित्र समजावीं. त्यांचा दुरुपयोग करून त्यांस भ्रष्ट करूं नये. शुद्ध आणि पवित्र अशा संगीतरवांनीं जें गृहमंदिर नित्य पावन होतें त्यांत सदैव शांति, आराम, व ऐक्यभाव वास करितात.

२७. तुमच्यानें होईल तर रंगभुमीवर नाट्यकलेच्या द्वारें मनोरंजन आणि नीतिशिक्षण यांचें ऐक्य करा. चांगल्या नाटकाच्या योगें करमणूक व बोध प्राप्त होतात.

२८. नाट्यकलेमध्यें परमेश्वरानें विलक्षण सामर्थ्य ठेविलें आहे. त्याजपासून आपलें व दुसऱ्यांचें हित करून घेतात ते धन्य!

२९. चांगल्या नाटकाच्या योगें पुष्कळ पातकी सन्मार्गास लागले आहेत, अनेक सामाजिक दुष्ट चाली लयास गेल्या आहेत, दुःखित अंतःकरणास आनंदलाभ झाला आहे, उद्विग्न चित्तास हुशारी आली आहे, दुर्व्यसनापासून लोकांचें रक्षण झालें आहे, बहुतांच्या ठायीं नव जीवन उत्पन्न झालें आहे.

३०. अतएव, तरुण गृहस्थांनीं एकत्र व्हावें आणि बोध व ज्ञान यांनीं परिपूर्ण असा पौराणिक अथवा नवीन

रचलेला एकादा कथाभाग कधीं कधीं नाटकद्वारें करून दाखवावा, आणि तेणें करून आपलें व आपल्या मित्र-मंडळीचें मनरंजन करावें. असले प्रसंग वारंवार मात्र आणूं नयेत.

३१. अशा प्रसंगीं सर्वांनीं फार जपलें पाहिजे. दुष्ट स्त्रिया अथवा दुर्व्यसनी पुरुष ह्यांस अशा कृत्यांत सहसा सामील करूं नये. कोणत्याही तऱ्हेचा अयोग्य अथवा बीभत्स प्रकार होऊं देऊं नये. ज्यांच्या योगें अंतःकरण भ्रष्ट होऊन नीति बिघडण्याची भीति असते अशा गोष्टींपासून मोठ्या सावधपणानें दूर राहिलें पाहिजे. तसेंच ज्यांच्या योगें आरोग्याची हानि होऊन शरीरप्रकृति खराब होण्याचा संभव आहे अशा सवयींविषयीं व दुर्व्यसनांविषयीं फार जपलें पाहिजे. शेवटीं, अशा प्रकारच्या करमणुकीमुळें आपल्या नित्याच्या व अधिक महत्वाच्या कर्त्तव्यांत कधींही विपर्यास होऊं देऊं नये.

३२. खेळाची रंगभूमि व तिजवरील सर्व सामान ईश्वरास अर्पण करा. जगचालक प्रभु साऱ्या विश्वाचा सूत्रधार तो तुमच्या रंगभुमीवर उभा आहे आणि त्याच्या समोर

तुह्मी नृत्य गीत करीत आहां, हा मंगल भाव अंतःकरणांत सदैव जागृत ठेवा.

३३. ह्या करमणुकीशिवाय कधीं कधीं सायंकाळीं मित्रमंडळीस आपल्या घरीं निमंत्रण करून सर्वांनीं मिळून एकत्र उपहार करावा, एकमेकांशीं विविध विषयांवर संभाषण करावें. अशा प्रकारच्या समागमाच्या योगें परस्परांमध्यें मित्रभाव वाढून बंधुप्रेमाचें वर्धन होतें.

३४. तसेंच, जिवलग मित्रांबरोबर बागांत अथवा उपवनांत फिरावयास जाऊन मित्रसमागमाचें सुख अनुभवावें. कधीं रानांत अथवा पर्वतावर, कधीं सुंदर नदीतीरीं किंवा प्रशांत समुद्रकांठीं एकांत स्थलीं बसून रमणीय सृष्टिशोभा अवलोकन करून साक्षात **जगच्चालक परमात्म्याशीं** समागम करावा.

३५. साधारण व्यवहारामध्यें सर्वांशीं मोकळ्या मनानें वागावें, हंसून खेळून असावें, कठिण शब्दानें कोणाचेंही मन दुखवूं नये. नेहमीं लहानथोरांशीं बंधुभावानें वागून सर्वांचें प्रेम संपादन करावें.



# अभ्यास आणि वाचन.

## ८

सायंकालीं भोजनाच्या अगोदर अथवा भोजन झाल्यावर फुरसतीच्या वेळीं बोधपर ग्रंथ अथवा मासिक पुस्तकें वाचावींत.

२. मनुष्य प्राणी हा शरीर, आत्मा, आणि मन ह्या तिहींचा झालेला आहे. पैकीं शरिराचें पोषण होण्यास अन्नाचें, आणि आत्म्याचें पोषण होण्यास भक्तीचें खाद्य लागतें. त्याचप्रमाणें मनाचें पोषण होण्यास त्यास ज्ञानाचें खाजें लागतें. त्याशिवाय त्याच्या अंगच्या शक्ती पूर्णावस्थेस येत नाहींत.

३. तुमचें वाचन व्यर्थ, निरुपयोगीं नसावें. ज्यांच्या वाचनाच्या योगें तुमचीं मनें भ्रष्ट होण्याचा संभव आहे अशीं पुस्तकें तुह्मी वाचूं नका.

४. ग्रंथ हे एक प्रकारचे मित्र होत. दुर्जनाच्या संगतीनें मनुष्य जसा सत्वर बिघडतो, तद्वत घाणेरड्या पुस्तकांच्या वाचनानें मनाची प्रवृत्ति दुराचरणाकडे होण्यास फारसा विलंब लागत नाहीं. यास्तव, असल्या पुस्तकांस स्पर्शही करूं नका.

५. चांगल्या ग्रंथासारखा श्रेष्ठ सत्समागम नाहीं. मनुष्यास अशा ग्रंथासारखा दुसरा विश्वासू मित्र व श्रेष्ठ गुरु नाहीं.

६. त्यांस वाचा नसतांही अडचणीच्या प्रसंगीं तो उत्तम सल्लामसलत देतो, आणि हात नसतांही दुःखिताचें अश्रुमार्जन करितो.

७. प्रत्येक गृहस्थानें उत्तम पुस्तकांचा संग्रह करावा आणि तो ज्ञानस्वरूप ईश्वरास अर्पण करावा.

८. शक्त्यनुसार कधीं कधीं योग्य पुस्तकें विकत घेऊन दिवसानुदिवस हा ग्रंथसंग्रह वाढवावा.

९. प्रत्येक कुटुंबांत अशा प्रकारचा पुस्तकसंग्रह असावा. तो लहान असला तरी चिंता नाहीं, परंतु निरनिराळ्या देशांत जे उत्तम उत्तम ग्रंथकार होऊन गेले आहेत त्यांचे चांगले चांगले ग्रंथ त्यांत अवश्य असावे.

१०. शरीरपोषणार्थ जसे अन्नाचे निरनिराळे प्रकार करावे लागतात, तसेंच मनाचें अन्न जें ज्ञान त्याचेही भिन्न-भिन्न प्रकार असले पाहिजेत. ह्मणून तुमच्या ग्रंथसंग्रहांत विविध विषयांवर पुस्तकें असावीं.

११. पदार्थविज्ञान, काव्य, नाटक, इतिहास, तत्वज्ञान, सत्पुरुषचरित्रें, बोधपरकथा, प्रवासवर्णनें, नामांकितवक्त्यांचीं भाषणें वगैरे सर्व विषयांवरील ग्रंथांचा संग्रह करावा. विशेषैंकरून सर्व राष्ट्रांतील धर्मपुस्तकांचा संग्रह अवश्य करावा.

१२. असले ग्रंथ उत्तम प्रकारचें धन असें जाणून त्यांची चांगल्या रीतीनें जतन करावी. त्यांमध्यें ईश्वरी सत्याचा ठेवा आहे, हें लक्ष्यांत बाळगून त्यांस फार जपावें व त्यांचें श्रद्धापूर्वक पठन करावें.

१३. नीतिशास्त्रसंबंधीं, ऐतिहासिक, अथवा सृष्टिज्ञानविषयक, कोणत्याही शास्त्राच्या संबंधीं सत्य ह्मणून जें कांहीं आहे तें साक्षात् ईश्वरापासून प्राप्त झालेलें, अतएव तें ईश्वरदत्त, असें समजून त्याचा सद्भावपूर्वक आदरच केला पाहिजे.

१४. आपलें नित्याचें वाचन मित असावें. अतिवाचनाचा दोष सहसा होऊं देऊं नये.

१५. अतिभोजनापासून जसे देहास कष्ट होतात तसाच अतिवाचनाच्या योगेंही मनास फार त्रास होतो.

१६. खाल्लेल्या अन्नाचें पचन न झाल्यामुळें शरिरास भयंकर व्याधी होतात.

१७. त्याचप्रमाणें आगणित ग्रंथ एक सारखें वाचीत गेल्यानें मनास त्यांचा भार न सहन होऊन त्याच्या सर्व शक्ती क्षीण होतात व त्याच्या ठायीं विचार करण्याचें सामर्थ्य राहात नाहीं.

१८. खरा वाचक असतो तो दररोज थोडींच पत्रें वाचतो, परंतु त्यांचें नीट मनन करून त्यांतील विषय आपलासा केल्याशिवाय पुढें वाचीत नाहीं.

१९. वाचनाचा मुख्य हेतु नुस्ती माहिती मिळविणें अथवा करमणूक करणें हा नाहीं. तर विचारद्वारें मनाची सुधारणा करून त्याच्या सर्व शक्ती पूर्णावस्थेस आणणें हा होय.

२०. विचार हा मनाचा पचनरस होय. पचनरसाच्या योगें पोटांत अन्नाचें पचन होऊन त्याचा परिपाक होतो, तद्वत विचाराच्या योगें ज्ञानापासून मनुष्यास शहाणपणा येतो, माहितीपासून अनुभव प्राप्त होतो,

आणि ग्रंथांतरीं जें काय सांगितलें असतें त्याजवर आत्म्याचें पोषण होतें.

२१. यास्तव, अतिशय वाचनाची, अतिशय अभ्यासाची, अथवा अनेक गोष्टी एकदम लक्ष्यांत राखण्याची हांव बाळगूं नका. ध्यानमननद्वारां स्वतंत्रपणें विचार करण्याचें सामर्थ्य वाढवून आपलें बुद्धिवैभव कायम राखण्याची इच्छा धरा.

२२. जें जें ह्मणून तुह्मीं वाचाल त्याच्या साधकबाधक गोष्टींचा विचार करून शांत चित्तानें मनन करा. त्यांतून जें कांहीं सत्य निघेल त्याचें ग्रहण करा आणि त्याप्रमाणें वागण्याचा सतत प्रयत्न करा.

२३. सारा जन्म वाचनांत गेला आणि शतशः ग्रंथ वाचून पालथे घातले, तरी ज्यांच्या मनाची संशयवृत्ति जात नाहीं व ज्यांस सत्यप्राप्ति होत नाहीं त्यांचें वाचन वरवरचें असतें असें समजावें.

२४. खरेंच आहे, समुद्राच्या सपाटीवर पोंहोणाराला पाण्यावर तरंगणारा गवतपाचोळाच मिळणार! तळाशीं बुडी मारिल्याशिवाय सत्याचीं मौक्तिकें कोठून लाभणार?

२५. वरवर वाचणाऱ्या विचारशून्य पुरुषानें सहस्त्रशः जरी ग्रंथ वाचिले तरी त्यांपासून त्याला कवडीचेंही ज्ञान होणार नाहीं. परंतु विचारी वाचकानें कोणत्याही ग्रंथाचें एक पत्र जरी वाचिलें तरी त्यांत त्याला अपरिमित ज्ञान दिसतें.

२६. ज्ञानसंपादन करण्यास कंटाळूं नका. कितीही वृद्ध झालां तरी विद्या प्राप्त करून घेण्यास लाजूं नका. देह धरणीवर पडेपर्यंत झटून ज्ञानसंपादन करा.

२७. गुरुश्रेष्ठ जो परमेश्वर त्याच्या चरणापाशीं राहून ज्ञानप्राप्तीच्या कामीं सदैव झटणें यासारखें महाभाग्य दुसरें नाहीं.

२८. जग हें एकाद्या मोठ्या शाळेप्रमाणें आहे. आणि त्यांत आपण विद्यार्थ्यांप्रमाणें ज्ञान व अनुभव प्राप्त करून घेण्यासाठीं आलों आहों. या ठिकाणीं आपला विद्याभ्यास चांगल्या रीतीनें पूर्ण करून एक दिवस स्वर्गामध्यें परिक्षा देण्याकरितां सर्वांस जावयाचें आहे, हें निरंतर लक्ष्यांत वागवा.

२९. काल्पित कादंबऱ्यांस भुलूं नका. त्या वाचण्याच्या मोहांत पडूं नका. त्या वाचिल्यानें क्षणभर मनो-

रंजन होऊन निवळ कल्पनाशक्तीचें मात्र समाधान होतें. त्यांपासून विचाराचें खाद्य मिळून मन संतुष्ट होत नाहीं.

३०. ज्यास कादंबरी वाचण्याचें वेड लागलेलें असतें तो निवळ छाया भक्षण करून कल्पनासृष्टींत वास करितो, असें ह्मणण्यास बाध नाहीं.

३१. घाणेरड्या व अमंगळ विचारांच्या पुस्तकांस तुह्मी स्पर्शही करूं नका.

३२. नास्तिक ग्रंथांविषयीं सावध राहा. त्यांतील विचार अपवित्र व भयंकर असतात.

३३. ईश्वराचें मंगल अस्तित्व नाकारून त्याची निंदा करणाऱ्या ग्रंथांचा प्रवेश घरांत होऊं देऊं नका. त्यांच्या योगें आपलें गृह विटाळूं नका.

३४. सर्व प्रकारचे नास्तिकमतप्रतिपादक ग्रंथ मनुष्याचे व ईश्वराचे महा दुष्ट शत्रू समजा आणि त्यांच्या सावलीसही उभें राहूं नका.

३५. प्रत्येक देशांतील धर्मग्रंथ ईश्वरी ज्ञानाचें अमित भांडार, अतएव त्या सर्वांस एकसारखे पूज्य माना.

३६. हे धर्मशील शिष्यहो, तुमच्या सर्व वाचनानें आणि अभ्यासानें **नवविधानाचा** विशेष गौरव होईल असें करा.

# दानधर्म.

## १.





घरामध्यें कितीही नियमानें नित्योपासना झाली, आणि ईश्वरप्रार्थनेचा कितीही घोष झाला, तरी घरांत जर दानधर्म होत नाहीं, तर तें गृह ईश्वराचें मंदिर नव्हे असें समजावें.

२. फळांवांचून वृक्ष जसा निरुपयोगी असतो, त्याप्रमाणें दानधर्मावांचून कोरडा भक्तिभाव हाही शुष्क व शून्य दिसतो.

३. ज्यांचें अंतःकरण आपल्या बंधूविषयीं कळवळत नाहीं, अशांनीं आपल्या पित्यावर आपलें दृढ प्रेम आहे असें तोंडानें कितीही म्हटलें, तरी तें सर्व ढोंगीं व दांभिक जाणावें. असे लोक स्वार्थावर दांभिक भक्तीचें आवरण घालूं पाहातात असें पक्कें समजावें.

४. परंतु ज्यांच्या मनांत भक्तीचा खरा जिव्हाळा असतो त्यांचें अंतःकरण प्रेमानें सर्वकाळ उचंबळलेलें असतें. त्यांच्या अंतःकरणसरोवरांतून प्रेमाचे पाट फुटून ते चहूंकडे वाहूं लागतात. त्यांच्या योगें जवळचे व दूरचे प्रदेश शांत व शीतल होऊन पुष्पफलांनीं सुशोभित दिसतात.

५. अतएव, स्वार्थासारखा दुष्ट, घातक शत्रु नाहीं असें जाणून प्रत्येक भक्तानें त्याचा परित्याग केला पाहिजे. अशा प्रकारें स्वार्थाचा नाश झाल्याशिवाय कोणतेंही गृह प्रेम आणि दया यांचें वसतिस्थान होणार नाहीं.

६. दीनदुबळ्यांस जो कांहीं धर्म करावयाचा तो त्यांचा धिःक्कार करून, किंवा त्यांस नीच अथवा हलके समजून आणि आपल्या ठिकाणीं मोठेपणा आणून अहंपणानें, जर कोणीं करितील तर त्याचा कांहीं उपयोग नाहीं.

७. कंगाल, गरीब, दुबळे अशांस सहाय्य करणें हें आपलें प्रथम कर्तव्य आहे असें पूर्णपणें लक्ष्यांत वागवून तें मोठ्या आनंदानें बजाविलें पाहिजे. त्यांस द्यावयाचें तें सत्कारपूर्वक दिलें पाहिजे.

८. धर्माच्या योगें धर्म घेणाराला जर एकपट सुख

होतें तर तो करणाराला त्याच्या दसपट सुख होतें व समाधान वाटतें. देणारा कदाचित रुपें देत असेल पण त्यापासून त्याला सुवर्ण प्राप्त होतें.

९. खरोखर धर्म करण्याचा महिमा असा आहे कीं, गरीबगुरिबांस आपण जें कांहीं देतों तें प्रत्यक्ष ईश्वरास पावतें.

१०. अशा ह्या श्रेष्ठ परमार्थाच्या कामीं उदास अथवा आळशी राहूं नका. सवडीप्रमाणें व शक्त्यनुरूप आपणाकडून जें कांहीं होण्यासारखें असेल तें करण्याविषयीं सतत जागृत असा—निद्रिस्त राहूं नका.

११. शिवाय हें लक्ष्यांत ठेवा कीं धर्म करावयाचा तो कधीं काळीं वाटेल तेव्हां करण्यांत अर्थ नाहीं.

१२. दानधर्म करणें हें तुमच्या घरांतील एक नित्यकृत्य होऊन बसलें पाहिजे. भक्ताच्या घरीं दयादेवता क्षणभरही निद्रिस्त होतां उपयोगी नाहीं.

१३. गरीब, दीन, दुबळे, तडी, तापडी हे केव्हांही तुमच्या दारीं आले, तरी त्यांस तुमचें दार उघडें असावें. अन्न, वस्त्र, अथवा आश्रय ह्यांपैकीं ज्याची ह्मणून त्यांस वाण असेल तें तुमच्या शक्तीप्रमाणें त्यांस अवश्य मिळावें. कोणासही विन्मुख जाऊं देऊं नये.

१४. अत्यंत दरिद्री व अति नीच असा जरी कोणी तुमच्या दाराशीं आला, तरी त्यास धुडकावून न देतां शांत चित्तानें त्याची सर्व हकीगत ऐकून घ्या आणि नंतर त्याच्या योग्यायोग्यतेविषयीं दयार्द्र अंतःकरणानें विचार करा.

१५. त्याच्या दानपात्रतेविषयीं तुमची खात्री होतां क्षणींच त्यास अन्नवस्त्र अथवा इतर जें कांहीं लागत असेल तें सद्भावपूर्वक देऊन त्याची रवानगी करावी.

१६. महिन्याचे महिन्यास धान्यसामुग्री घेऊन स्वतःच्या कुटुंबाची बेगमी करितां तेव्हांच गरीबगुरिबांस धर्म करण्याप्रीत्यर्थ ह्मणून धान्य घेऊन ठेवीत जा. हें धान्य धर्मार्थ ह्मणून निराळें काढून ठेविलेलें असावें व त्याचा उपयोग दुसऱ्या कारणाकडे सहसा होऊं नये.

१७. तुमचीं जुनींपुराणीं वस्त्रें गरिबांकरितां सांठवून ठेवीत जा. आणि ज्यांस तीं उपयोगीं पडण्यासारखीं असतील त्यांस देत जा.

१८. परोपकारार्थ स्थापन झालेल्या मंडळ्यांस दरमहा तुमच्या शक्तीप्रमाणें कांहीं तरी ठरीव देणग्या देत जा. त्या सहसा बंद करूं नका.

१९. कांहीं कारणामुळें तुमची प्राप्ति कमी होऊन तिच्यावर तुमच्या संसाराचा खर्च भागेनासा झाला तर ह्या देणग्या आपल्या प्राप्तीच्या मानानें कमी करा, परंतु एकदम बंद करूं नका.

२०. तुह्मांस जो कांहीं पैसा मिळतो तो सर्वथा तुमच्याच सुखाकडे किंवा ऐषआरामाकडे खर्च करण्याचा अधिकार तुह्मांस नाहीं. तुमचें धन ही साक्षात् परमेश्वराची ठेव असें जाणून तिचा व्यय केला पाहिजे.

२१. माझा भक्त कितीही गरीब व दरिद्री असला तरी त्यानें आपल्या प्राप्तीचा थोडा तरी भाग परोपकारबुद्धीनें धर्मकृत्यांकडे खर्च करावा, अशी परमेश्वराची आज्ञा आहे. हा प्राप्तीचा भाग ज्यांचा त्यांस न देणें ह्मणजे दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणें होय. परद्रव्यापहारासारखें घोर पातक न करण्याविषयीं प्रत्येकानें सावध राहिलें पाहिजे.

२२. परमेश्वरानें प्रत्येकाजवळ आपली ठेव ठेविली आहे. तिच्यापैकीं गरिबांचा भाग गरिबांस देऊन तिचा आपण योग्य विनिमय करितों असें प्रत्येकानें ईश्वरास दाखविलें पाहिजे.

२३. दानधर्मामध्यें परोपकाराच्या अनेक कृत्यांचा समावेश होतो. धर्मवासनेच्या द्वारें होणारीं अशीं पुष्कळ कृत्यें आहेत.

२४. भुकेल्यांस अन्न, तान्हेल्यांस पाणी, आणि उघड्यांस वस्त्र देणें; तसेंच रोगग्रस्तांस औषधपाणी देणें, दुखणाइतांचा समाचार घेणें, दुःखितांचें शांतवन करणें, गृहरहितांस आश्रय देणें, निराश्रित विधवा स्त्रिया व पोरकीं मुलें यांस सहाय्य करणें, गरीब विद्यार्थ्यांस पुस्तकें देणें, दवाखाने, शाळा, मंदिरें, स्थापन होऊन चालूं राहाण्यास मदत करणें इ० अगदीं नेहमींचीं परोपकाराचीं कामें होत. प्रसंग पडेल तेव्हां धनानें, मनानें, व स्वतःच्या सामर्थ्यानें ह्यांस सर्वांनीं अवश्य सहाय्य केलें पाहिजे.

२५. विशेष कालीं व विशेष प्रसंगीं परोपकाराचीं विशेष कार्यें उद्भवतात. तेव्हां ईश्वरेच्छेस अनुसरून त्यांही कृत्यांस सहाय्य करण्यास उद्युक्त झालें पाहिजे.

२६. स्वदेशीं किंवा परदेशीं दुष्काळ पडून किंवा वाखा, पटकी, जरीमरी अशा भयंकर रोगांच्या सांथी येऊन शेंकडों हजारों मानवप्राणी अन्नान्नदशेस लागून दारुण

व्याधींनीं ग्रस्त होतात; तसेंच जलप्रलयानें अथवा अग्निप्रलयानें मोठमोठीं गांवें एका क्षणांत नाहींशीं होऊन आपले मनुष्यबंधू निराश्रित होऊन पडतात. अशा अरिष्टाच्या प्रसंगीं परदुःखनिवारणार्थ प्रत्येकानें विशेष सहाय्य केलें पाहिजे.

२७. उष्णकालीं सूर्याच्या असह्य तापानें तान्हेल्यांस व तप्त झालेल्यांस निर्मळ थंडगार पाणी पिण्यास देऊन त्यांस शांत करावें. दुरून थकून भागून आलेला प्रवासी तुमच्या दारीं आल्यास त्यास बिऱ्हाडास जागा देऊन भोजनास घालावें—उपवासी परत जाऊं देऊं नये.

२८. तसेंच, शीतकालीं गरीबगुरिबांस थंडीचा त्रास न व्हावा ह्मणून त्यांस गरम कपडे द्यावे.

२९. धर्म करण्यास पात्र असतील त्यांसच धर्म करा. पात्रापात्रविचार केल्याशिवाय धर्म केल्यानें लोक आळशी होऊन देशांत दारिद्र्य वाढतें. यास्तव दीन, दुबळे, लंगडे, लुळे, अशांस मात्र धर्म करा. धट्टेकट्टे श्रम करण्यास समर्थ अशा आळशी लोकांस केलेला धर्म सत्पात्रीं होत नाहीं. अतएव तो करूं नये.

३०. जो दानधर्म करावयाचा तो सर्वदां निरपेक्ष

बुद्धीनें परोपकारार्थ करावा. लोकांनीं आपणास बरें ह्मणावें ह्मणून कधींही करूं नये. लोकांत आपलें मोठें नांव व्हावें अशा बुद्धीनें केलेला धर्म व्यर्थ होय. अतएव जें कांहीं द्यावयाचें तें मुकाव्यानें, कोणास न कळवितां द्यावें. त्याविषयीं लोकप्रसिद्धी होऊं देऊं नये.

३१. खरा धर्म हातापेक्षां अंतःकरणांत अधिक आहे, ह्मणजे हातानें दान करितात तेवढेच धर्म करितात असें नाहीं. तर ज्यांच्या अंतःकरणांत धर्मवासना उत्पन्न होते, परंतु निरुपायास्तव ती त्यांच्यानें पूर्ण करवत नाहीं, असेही लोक मोठे धार्मिक होत. कामुक बुद्धीनें श्रीमंतांनीं दान केलेल्या धनाच्या राशी ईश्वराच्या घरीं रुजूं होत नाहींत, परंतु एकाद्या गरिबानें निष्काम बुद्धीनें व शुद्ध मनानें दिलेला पैसा ईश्वरास फार प्रिय होतो.

३२. परोपकाराप्रीत्यर्थ जे कोणीं आपलें जीवन धारण करितात व स्वतःचा देह परहिताच्या कामीं सतत झिजवितात ते धन्य! असे धार्मिक जन खरे भक्त! इहलोकीं व परलोकीं ते अवश्य सुख पावतील.



# आप्तविषय आणि संबंधी.

## १०.

संसारी मनुष्याचे संसारसंबंधीं सर्व संबंध परम पवित्र होत. त्यांस ऐहिक समजून त्यांचा धिःकार करितात ते सुख पावणार नाहींत.

२. भक्ति, ज्ञान, वैराग्य, योगसाधन, परोपकार इ० धार्मिक गोष्टींचें आडंबर घालून संसारसंबंधीं आपलीं नित्याचीं कर्तव्यकर्में विसरणारे, आणि आईबापें, मुलेंलेंकरें यांच्या सारख्या अति निकट संबंधी जनांचा तिरस्कार करणारे पुष्कळ लोक आहेत. अशांस धर्मसाधनाचें खरें रहस्य समजलें नाहीं यांत संशय नाहीं.

३. आपण अंतरालांत अति उंच प्रदेशीं परिभ्रमण करणारे, या जगताशीं व त्यांतील अनंत व्यवसायांशीं

आपला बिलकुल संबंध नाहीं, असें त्यांस वाटतें. परंतु हा सर्व भ्रम होय.

४. असे लोक धर्मनिष्ठ नव्हत—पण धर्मभ्रष्ट मात्र होत. कारण कीं, संसारसंबंधीं सर्व कर्त्तव्य कर्मे व आप्तसंबंध साक्षात परमेश्वरानेंच लावून दिले असल्यामुळें ते अत्यंत पवित्र होत. जे कोणी अभिमानानें त्यांस तुच्छ समजून त्यांचा धिःकार करितात त्यांस परमेश्वर शासन केल्यावांचून राहाणार नाहीं.

५. अहो अभिमानी जन हो, आपलें गृह तुह्मी अपवित्र समजतां काय? त्या ठिकाणीं ईश्वरभक्ति होत नाहीं असें तुह्मांस वाटतें काय? तुमचीं मातापितरें, बायकापोरें ह्यांस तुह्मी पशुवत लेखितां काय? ह्यांच्या सहवासास राहून धर्माचरण होणार नाहीं, असें जर तुह्मांस वाटत असेल तर हा तुमचा निवळ भ्रम होय.

६. हा मिथ्या भ्रम सोडा, आणि आपला संसार प्रेममय परमेश्वराचें वसतिस्थान व त्यांतील आपले सर्व आप्तसंबंधी परम पवित्र असें समजा. त्या सर्वांची सद्भावपूर्वक सेवा करण्याकरितां परमेश्वरानें तुह्मांस निर्माण केलें आहे.

७. हें सकल मानवकुटुंब परमेश्वराचें होय. अतएव त्यांतील तुमचा एकादा आप्त कितीही कनिष्ठ व दूरचा असला तरी तुह्मीं त्याचा तिरस्कार करितां कामा नये.

८. तुमचें हरएक लहानमोठें कर्त्तव्य तुह्मी कोणत्या रीतीनें बजावीत आहां याविषयीं तुह्मांस येथें व परलोकींही जबाब द्यावा लागेल.

९. तुमच्या मातापितरांचा अधिकार किती मोठा आहे हें तुह्मांस ठाऊक नाहीं काय? तुमची माता व तुमचा पिता स्वर्गीय होत.

१०. साधु पुरुषांस जसा मान देतां त्याप्रमाणें आपल्या आईबापांस सन्मान द्या व त्यांचें नित्य वंदन करा.

११. कारण, तुह्मांस तुमच्या पित्याइतका थोर साऱ्या जगांत अन्य कोणीही नाहीं; तुमच्या मातेप्रमाणें वंदनीय दुसरें कोणीच नाहीं.

१२. आपल्या प्रिय बालकांचें पालनपोषण करून त्यांस सन्मार्ग दाखविण्याकरितां साक्षात विश्वजननी ह्या मातापितरांच्या रूपानें इहलोकीं अवतरते ह्यांत संशय नाहीं.

१३. आपल्या मानवी पित्याच्या ठायीं आपल्या

स्वर्गलोकींच्या **पित्यास** अवलोकन करा; आणि आपल्या जन्मदात्या मातेच्या हृदयांत **विश्वजननीचें** अलौकिक प्रेम मूर्तिमंत अवलोकन करा.

१४. खरोखरच मातापितरें परम वंदनीय होत. त्यांच्या इतकें पुण्यशील दुसरें कोणीही नाहीं.—

मातरं पितरं चैव साक्षात् प्रत्यक्ष देवताम्
मत्वा गृहि निषेवत सदा सर्व प्रयत्नतः

महानिर्वाण—८: २४.

१५. पुत्रांनो व कन्यांनो, आईबापांचें सांगणें ऐका, त्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करूं नका. सदैव त्यांची सेवा करा, त्यांस कोणत्याही गोष्टीची वाण पडूं देऊं नका, त्यांचें दुःख होईल तितकें दूर करा, आणि सर्वदां मधुर भाषणानें त्यांच्या अंतःकरणास संतोष द्या.

१६. मुलांवर मातापितरांचे जे अनंत उपकार होतात ते कधींही फिटावयाचे नाहींत. तथापि तुमच्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत शरिरानें व मनानें रात्रंदिवस खपून त्यांची सेवाचाकरी करा.

१७. तीं वृद्ध होऊन पंगु झालीं ह्मणजे त्यांचा मोठ्या प्रेमानें सांभाळ करा; त्यांच्या ऐहिक सुखाप्रीत्यर्थ

झटून त्यांच्या जीवास आराम द्या; सायंकालीं नियमानें त्यांच्या जवळ बसून मधुर गायन करावें किंवा धर्मपर ग्रंथ वाचावे. अशानें त्यांच्या आत्म्यास संतोष होतो.

१८. आईबापांची चाकरी करावयाची ती मोलाच्या माणसांप्रमाणें वरवर कंटाळ्यानें व जुलमाखातर करून उपयोगी नाहीं. ती अंतःकरणपूर्वक, मोठ्या ममतेनें, कृतज्ञतापूर्वक, अशी मनापासून झाली पाहिजे.

१९. परमेश्वराच्या मानवकुटुंबांतील पुत्रकन्यांनो, तुह्मी आपापल्या मातापितरांच्या अनुशासनाधीन राहून नित्यशः नूतन भक्ति, प्रेम, आणि सद्गुण संपादन करा.

२०. मातापितरांनो, तुह्मी आपल्या मुलांस शारिरिक, मानासिक, व धर्मसंबंधीं शिक्षण द्या, आणि त्यांस परमेश्वराचे खरे भक्त करा.

२१. अतिशय लाडानें जशीं मुलें बिघडतात त्याचप्रमाणें त्यांच्यावर अतिशय जुलूम केल्यानेंही तीं बिघडतात.

२२. यास्तव, आईबापांनीं मुलांवर आपला अधिकार फार सौम्य रीतीनेंच चालवावा. शिक्षेच्या वेळीं शिक्षा करावी, आणि मायेच्या वेळीं मायाही करावी.

२३. शिक्षणाच्या संबंधानें मुलांवर त्यांच्या बालपणापासून विशेष सक्ती करणें बरें नाहीं. अशा वयांत आयासावांचून स्वाभाविक रीतीनें तीं शिकतील तितकेंच त्यांस शिकूं द्यावें.

२४. त्यांच्या विश्रांतीच्या अथवा खेळाच्या आड येऊं नये. त्यांच्या खाण्यापिण्याची आबाळ न होऊं देतां त्यांची वाढ पूर्ण होऊन प्रकृति निकोप राहील अशी योजना करावी.

२५. योग्य वयापूर्वीं त्यांच्या बुद्धीचा विकास न व्हावा व बालपणींच त्यांस प्रौढावस्था प्राप्त न व्हावी अशाविषयीं फार सावध असा.

२६. आरोग्यासारखें दुसरें धन नाहीं. ह्मणून मुलांस प्रथमतः आरोग्यदान करा. मोकळी हवा, पौष्टिक अन्न, योग्य व्यायाम, आणि बेताची विश्रांति हीं आरोग्यप्राप्तीचीं मुख्य साधनें होत.

२७. मुलें थोडीं मोठीं झालीं ह्मणजे त्यांस नीतिशिक्षण द्यावें, आणि पुढें तीं अमळ प्रौढ वयांत आलीं ह्मणजे त्यांस धर्मशिक्षण द्यावें.

२८. तरुण मुलांस कोरडे धर्मसिद्धांत शिकवून उप-

योग नाहीं. धर्मसंबंधीं विषयांवरील प्रश्नोत्तरसंग्रहाचे ग्रंथ मुलांकडून पोपटाप्रमाणें मुखपाठ करविण्यांत अर्थ नाहीं. ईश्वराविषयीं भीति व त्याच्या ठायीं शुद्ध भक्ति त्यांच्या मनांत उत्पन्न केली पाहिजे.

२९. कांहीं सद्गुण मुलांस आईपासूनच शिकावयाचे असतात व कांहीं बापापासून शिकावयाचे असतात. यास्तव, मुलांच्या शिक्षणाच्या कामीं आई आणि बाप या उभयतांनींही झटलें पाहिजे. उभयतांपैकीं प्रत्येक जणानें आपापला कार्यभाग उत्तम रीतीनें बजाविल्याशिवाय मुलांचें शिक्षण कदापि पूर्ण व्हावयाचें नाहीं.

३०. बापाचे सर्व सद्गुण आणि आईचा चांगुलपणा मुलांच्या स्वभावांत पूर्णपणें उतरल्याशिवाय त्यांचें शिक्षण कदापि पूर्ण होत नाहीं.

३१. कुसंगति व अनीतिप्रवर्तक सहवास यांपासून तरुण मुलांचें रक्षण करा.

३२. बालपणींच मुलांच्या कोमल मनांवर उत्तम गोष्टींचा ठसा उमटावा एतदर्थ मुलांमुलींस उत्कृष्ट ग्रंथ वाचावयास द्यावे, चांगल्या मनुष्यांची ओळख करून

द्यावी, तसेंच नीतिमान कथांचीं चित्रयुक्त पुस्तकें त्यांस बक्षीस द्यावीं.

३३. लहानपणींच मुलांच्या मनांत पुष्पांची आवड उत्पन्न करावी, त्यांस सृष्टिसौंदर्याची गोडी लावावी, व त्यांच्या अंतःकरणांत कवित्वाची अभिरूचि जागृत करावी.

३४. घरासमोर लहानशी बाग असल्यास त्यांस वारंवार तिजमध्यें न्यावें व तऱ्हतऱ्हेचे वृक्ष व फुलझाडें दाखवावीं. केव्हां केव्हां झाडांसभोंवतीं आळीं करणें, त्यांस पाणी घालणें, इत्यादि अल्पस्वल्प कामेंही त्यांच्या हातून करवावीं.

३५. घरांत पाळीव प्राणी किंवा पक्षी असल्यास त्यांस मुलांकडून दाणापाणी घालवावें. अशानें प्राणिमात्रांविषयीं प्रेम व दया त्यांच्या मनांत उत्पन्न होतात.

३६. धार्मिक मनुष्यांच्या मुलांबाळांनीं किडी मुंगीसारख्या अति सुक्ष्म प्राण्यांवर विशेष दया केली पाहिजे. भूतदया हें बालकांचें परम श्रेष्ठ कंठभूषण.

३७. लहान मुलांस मोठ्या आदरानें वागवावें, त्यांचा कधींही धिःकार करूं नये. कारण त्यांच्यासारखीं ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध व निष्कपट असतात तेच स्वर्गाचे

अधिकारी होतात. ह्मणून, ईशकृपेनें ज्यांच्या घरीं मुलें असतील त्यांनीं त्यांच्या शिक्षणाच्या कामीं सदां दक्ष असलें पाहिजे. मुलांस अशा रीतीनें लहानाचें मोठें करावें कीं भक्ति, ज्ञान, पवित्रता इत्यादि त्यांच्या ठायीं सदैव वास करितील व शेवटीं तीं ईश्वराच्या ब्रह्मराज्याचे अधिकारी होतील.

३८. आपापल्या मुलांच्या शिक्षणाचे कामीं सर्व मानवी मातापितरांनीं **सर्वश्रेष्ठ माता** अत्यंत कारुणिक **विश्वजननी** तिचें प्रतिक्षणीं सहाय्य मागावें. तिच्यासारखा सर्वोत्तम मार्गदर्शक सकल सद्गुणांचा निधी अन्य कोणीही नाहीं. हें लक्ष्यांत वागवावें.



# बंधुभगिनी.

## ११.

बंधूंनीं आपल्या भगिनींवर आणि भगिनींनीं आपल्या बंधूंवर प्रेम करावें.

२. भावंडें एकाच मातापितरांच्या उदरीं जन्मलेलीं असतात. त्यांचा सहोदरसंबंध असतो, ह्मणून त्यांनीं परस्परांशीं प्रेमबंधनानें बद्ध असावें.

३. एकमेकांच्या आंगीं कितीही दोष असले, परस्परांमध्यें कितीही मतवैपरीत्य व स्वभाववैचित्र्य असलें, तरी बहिणभावांच्या प्रेमांत कधींही अंतर पडूं नये.

४. मातापितरांच्या घरीं मुलें असतात तेव्हां त्यांनीं एका कुटुंबांतील माणसांप्रमाणें सलूख्यानें राहावें, तंटाभांडण होऊं देऊं नये, एकमेकांवर निष्काम प्रेम करावें.

५. हेवामत्सरास अंतःकरणांत सहसा स्थान देऊं

नये. धाकट्यांनीं वडिलांचा अपमान करूं नये, व वडिलांनींही धाकट्यांचा तिरस्कार करूं नये.

६. मुलें मोठीं होऊन त्यांचे विवाह झाल्यावर पाहिजे असल्यास मुलांनीं आपापल्या पत्नीसह व मुलींनीं पतीसह स्वतंत्र राहावें. परंतु अशा रीतीनें निरनिराळें राहाणें झालें तरी परस्परांच्या प्रेमांत विपर्यास होऊं नये.

७. बंधुभगिनी कोठेंही राहात असलीं तरी त्यांच्यांत अप्रेम असूं नये—शांति व ऐक्य हेंच असावें. कारण, प्रत्यक्ष परमेश्वरानें जें प्रीतिबंधन लावून दिलें आहे तें तोडण्याचा अधिकार कोणासही नाहीं.

८. विवाहानंतर भावांभावांमध्यें वारंवार कलह उत्पन्न होतात. भाऊ भाऊ कितीही सुस्वभावी असले तरी त्यांच्या कलहप्रिय बायकांमुळें त्यांच्यांत वितुष्ट उत्पन्न होऊन शेवटीं ते एकमेकांचे शत्रू बनतात.

९. याविषयीं सर्वांनीं सावध असलें पाहिजे. पत्नीची मर्जी राखण्याकरितां सख्या भावाशीं अथवा सख्या वहिणीशीं कोणीही वांकडें होऊं नये.

१०. तसेंच नवऱ्याचें प्रेम संपादन करण्याकरितां स्त्रीनही सख्या भावाशीं अथवा बहिणीशीं शत्रुत्व पतकरूं नये.

११. बंधुत्व व बंधुप्रेम यांचें वास्तविक महत्व बंधुभगिनींनीं निरंतर लक्ष्यांत वागवावें आणि परस्परांशीं आपले सर्व व्यवहार असे ठेवावे कीं, त्यांवरून इतरांस बंधुभावाच्या संबंधानें आपलें आचरण कित्त्याप्रमाणें अनुकरणीय होईल.

१२. प्रत्येक कुटुंबांतील बंधुभगिनीमंडल ह्याप्रमाणें वागेल तर शेवटीं सर्व मनुष्यमात्राचें एक मोठें कुटुंब होऊन त्यांतील बंधुभाव दिवसानुदिवस वाढत जाईल. तेणेंकरून परमेश्वर आपला पिता व आपण त्याचीं बालकें, हा जो मंगळ संबंध तो विशेष दृढ होत जाईल.



# पतिपत्नी.

## १२.



विवाह हा दैवी संबंध होय; अतएव तो सर्वांनीं परम पवित्र मानिला पाहिजे.

२. जे कोणी ह्या गंभीर संबंधाची गणना ऐहिक व्यवहारांत करितात त्यांस त्याचें पूर्ण महत्व समजत नाहीं.

३. पति अथवा पत्नि, हा काय बाजारचा माल आहे कीं तो पाहिजे तसा विकत घेतां किंवा देतां येईल!

४. राजदरबारीं सरकारी अधिकाऱ्यांच्या पुस्तकांत विवाह नोंदला एवढ्यावरूनच तो देवाच्या घरीं मंजूर होतो काय?

५. विवाह हा शारिरिक संबंध नव्हे, आत्मिक संबंध होय. विवाहांतील प्रेमग्रंथी साक्षात परमेश्वर आपल्या हातानें बांधितो, आणि एका आत्म्यास दुसऱ्याशीं प्रेमानें बद्ध करितो.

६. जो विवाहसंबंध प्रत्यक्ष परमेश्वराच्या साक्षीनें होत नाहीं तो मुळीं विवाहच नव्हे.

७. यास्तव, ज्या कोणास विवाह कर्तव्य असेल त्यांनीं सरकारच्या अधिकाऱ्यांच्या सहाय्यानें परस्परांस विकून घेऊं नये. राजाधिराज परमेश्वर त्याच्या साक्षीनें व त्याच्या हातानें आपली पवित्र विवाहग्रंथी बांधून घ्यावी, आणि तिच्यावर त्याच्या मंगल आशिर्वादाचें शिक्का-मोर्तब करून घ्यावें.

८. कारण परमेश्वराच्या आशिर्वादाशिवाय व अनुग्रहाशिवाय विवाहासारखी महत्वाची जबाबदारी पतकरून संसारी गृहस्थाचीं कर्तव्यें केवळ आपल्या एकट्याच्याच सामर्थ्यावर बजावण्यास कोण समर्थ आहे ? कोणी नाहीं.

९. अतएव, विवाहदेवतेसमोर मस्तक नम्र करा. तिचा आशिर्वाद संपादन करा, तिची कृपा आणि सामर्थ्य अंतःकरणांत सांठवा, आणि नंतर संसारमंदिरांत प्रवेश करा. नाहीं तर संसारांतील नानाविध संकटें टाळण्यास व भयंकर मोह जिंकण्यास तुह्मी कदापि समर्थ होणार नाहीं.

१०. तुमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत नित्यशः परमेश्वरापाशीं हेंच मागा कीं—हे देवा, आमचा हा आत्मिक संबंध दिवसानुदिवस अधिकाधिक दृढ होत जाऊन शेवटीं आह्मीं उभयतां चिरकालपर्यंत ऐक्यावस्थेंत राहूं असा अनुग्रह कर.

११. लग्नसंबंध झाला ह्मणजे विवाहित अवस्थेंतील सुखाची परिसमाप्ति झाली असें नाहीं. प्रेम आणि पवित्रता हे आत्म्याचे दोन गुण ज्या अवस्थेंत एकसारखे वर्धन पावत असतात अशी जी विवाहितावस्था तिला ह्या लग्नसंबंधानें केवळ प्रारंभ होतो असेंच समजावयाचें.

१२. इहलोकीं स्त्रीपुरुषांचा विवाह कधींही पूर्ण होत नाहीं. शेवटीं मरणानंतर पतिपत्नींच्या आत्म्यांचें शाश्वत ऐक्य होऊन उभयतांस परस्पर समागमाचें अविच्छिन्न सुख प्राप्त व्हावयाचें असतें. विवाह ही त्या सुखाची प्रथम पायरी होय.

१३. यास्तव, पतिपत्नींनीं हें आत्मिक ऐक्य वाढविण्याचा सतत प्रयत्न करावा.

१४. इहलोकीं पति व पत्नि ह्या दोन निरनिराळ्या स्वतंत्र व्यक्ती दिसतात. तथापि, मृत्यूनंतर परस्परांच्या

आत्म्याचें ऐक्य झाल्यावर त्यांच्यामधील सर्व भेद नष्ट होईल. तीं दोघें पूर्णपणें एक होतील, त्यांच्यामध्यें कोणत्याही प्रकारचा वियोग अथवा विपर्यास होणार नाहीं. हाच खरा विवाह होय.

१५. सारांश, लग्नसंस्कार हा या आत्मिक विवाहाचें उत्तम द्योतक होय. यास्तव, पतिपत्नींनीं परस्परांवर पूर्ण विश्वास ठेवावा, शुद्ध प्रेम करावें, व ऐहिक आणि पारलौकिक गोष्टींमध्यें सदांसर्वदां ऐक्यभावानें व सलुख्यानें वागावें. असें झाल्याशिवाय विवाह सफल व्हावयाचा नाहीं.

१६. पतीनें पत्नीचा, किंवा पत्नीनें पतीचा धिःकार करून आपल्या आंगीं श्रेष्ठपणा घेऊन एकमेकांवर कोणत्याही प्रकारचें वर्चस्व चालविण्याचा प्रयत्न करूं नये. परमेश्वराच्या घरीं उभयतांचाही अधिकार एकसारखाच आहे, हें निरंतर ध्यानांत बाळगून संसार करावा.

१७. जे पुरुष आपल्या स्त्रियांस गुलामांप्रमाणें वागवितात, त्यांस घरामध्यें कैद्यांप्रमाणें प्रतिबंधांत ठेविल्याशिवाय त्यांचें पातिव्रत्य कदापि सुरक्षित राहाणार नाहीं, असें ज्यांस वाटतें, तसेंच जे त्यांची सुधारणा न करितां

त्यांस निरंतर दुर्धर दास्यावस्थेंत ठेवूं पाहतात ते त्यांचे पती ह्मणवून घेण्यास योग्य नाहींत.

१८. तसेंच, पतीचा नानाप्रकारें छल करून, अथवा मोहपाशांनीं त्यास बद्ध करून त्याजवर आपलें वचर्स्व ठेवूं पाहणारी स्त्रीही पत्नी ह्मणवून घेण्यास सहसा योग्य होत नाहीं.

१९. संसारांत पतीनें पत्नीवर अथवा पत्नीनें पतीवर कोणत्याहीं प्रकारचा जुलूम करूं नये. उभयतांनीं एक मतानें संसार करावा.

२०. स्त्रीपुरुषांची योग्यता व अधिकार सारखे आ- हेत; तरी पुरुषानें व स्त्रीनेंही आपापल्या कर्तव्यांमध्यें दक्ष राहावें—दुसऱ्याचा अधिकार बळकावण्याचा प्रयत्न करूं नये.

२१. कुटुंबांतील प्रत्येक जणास परमेश्वरानें एकेक कार्यभाग नेमून दिला आहे. तो कोणीही सोडूं नये.

२२. पुरुषानें स्त्रीत्व पतकरून घरांतील गृहकृत्य क- रण्याची इच्छा धरूं नये; स्त्रीनेंही आंगीं पुरुषपणा आ- णून पुरुषाचें काम करण्याची हांव धरूं नये.

२३. प्रत्येकास परमेश्वरानें जें कांहीं कर्तव्य लावून

दिलें असेल तें स्त्रीनें व पुरुषानेंही संतोषानें करावें. दोघांनींही एकमेकांस आपले सहाय्यकारी समजावें—प्रतिस्पर्धी समजूं नये.

२४. जी स्त्री परमेश्वराची अवज्ञा करून आपला कोमल देहस्वभाव विसरते, व आपला वास्तविक कार्यभाग सोडून अत्यंत कष्टसाध्य व स्त्रीजातीस अयोग्य अशीं पुरुषांचीं कामें करिते तीस धिक्कार असो! अशा स्त्रीचा सर्वथा नाश होईल आणि शेवटीं तिला लज्जा व अप्रतिष्ठा भोगणें भाग पडेल.

२५. गर्वानें जसा कुटुंबाचा घात होतो, तसेंच हेवा अथवा मत्सर यानेंही संसाराचें मातेरें होऊन कुटुंबसुखाचा सर्वस्वी नाश होतो. यास्तव, मत्सर करणें हें मोठें पाप होय, असें समजून त्यापासून दूर राहा.

२६. विश्वासघातासारखें दुसरें महत्पातक नाहीं. आणि स्त्रीनें आपलें पातिव्रत्य व पुरुषानें आपलें पत्निव्रत भंग होऊं देणें यासारखा महा विश्वासघात नाहीं. यास्तव, हें व्रत फार सावधगिरीनें पाळिलें पाहिजे. तें भंग करण्याच्या विचाराच्या नुस्त्या छायेनेंही अंतःकरण विटाळतें.

२७. जें पातिव्रत्य राखण्यास महत्प्रयास पडतात, निर्धास्त स्थलीं मात्र जें सुरक्षित राहातें—अगदीं अल्प मोहानेंही ज्याचा नाश होतो—तें खरें पातिव्रत्य नव्हे. स्त्रीपुरुषांमधील प्रेम इतकें दृढ असलें पाहिजे कीं, कसाही प्रबल मोह प्राप्त झाला तरी ज्यांच्या योगें ह्या प्रेमाचा नाश होण्याचा संभव आहे अशा प्रकारचे विचारही त्यांच्या मनांत येऊं नयेत.

२८. पातिव्रत्याबरोबर आंगीं अचल प्रेमही असलें पाहिजे. पहिल्या सणाद्गुच्या योगें स्त्रियांची योग्यता कायम राहाते, दुसऱ्याच्या योगें त्या इतरांची योग्यता वाढवितात. पातिव्रत्य ही एक प्रकारची कळी व प्रेम हें तिचें प्रफुल्लित पुष्प असें ह्मणण्यास चिंता नाहीं.

२९. यास्तव, पतिपत्नींनीं परस्परांवर निर्भर प्रेम करावें, व एकमेकांच्या अंतःकरणांत प्रेमाच्या द्वारें चिरकाल वास करावा.

३०. एकमेकांच्या सहाय्यानें उभयतां जसा संसार चालवितात तशीच दोघांनीं मिळून नित्यशः ईश्वरोपासना करावी. कधीं कधीं पारमार्थिक विषयांवर संभाषण करून आपले विचार परस्परांस निवेदन करावे.

३१. पतिपत्नी एकांत स्थलीं एकत्र बसून आनंदभरित अंतःकरणानें ज्या कालीं परमात्म्याचें ध्यान, भजन, चिंतन करितात त्या कालचा तो देखावा अत्यंत रमणीय होय! तो पाहून जगदात्म्यास परम संतोष होतो.

३२. अशा प्रकारें संसार करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या स्वर्गसुखास इहलोकींच प्रारंभ होतो. मरणोत्तर तीं शाश्वत सुखानंदांत चिरकाल वास करितात.



# चाकरनौकर.

## १३.

ज्या घरांतील माणसें आपल्या चाकरनौकरांनां मायेनें वागवितात आणि त्यांस कोणत्याही गोष्टीची वाण पडूं देत नाहींत तें गृह धन्य!

२. कधीं कधीं मनुष्यें गर्वानें फुगून जातात व आपल्या चाकरमाणसांचा द्वेष व तिरस्कार करितात. त्यांचा समाचार घेतल्यानें आपला अपमान होतो असें त्यांस वाटतें.

३. ते आपल्या मनांत ह्मणतात कीं दुसऱ्याचें काम करणें, त्यांच्या उपयोगी पडणें, हें काम चाकराचें आहे, धन्याचें नाहीं.

४. परंतु हें ह्मणणें रास्त नाहीं. केवळ चाकरानेंच काम करावें असें नाहीं; धन्यानेंही काम केलें पाहिजे. जो काम करीत नाहीं तो धनी होण्यास योग्य नाहीं.

५. सकल पृथ्वीपति विश्वनायक परमेश्वर तो देखील आपलें राजासन सोडून अति हीन दीन अशा जीवांची सेवा करण्याकरितां नित्य इहलोकीं येतो; तेव्हां इतरांचा काय पाड!

६. ह्या कामीं पामर माणसांनीं अभिमान बाळगण्याचें काय प्रयोजन? मनुष्यांनीं अभिमानाचा सत्वर त्याग करावा आणि आपली सेवा करणाऱ्या चाकरांच्या उपयोगी पडणें हें महद्भाग्याचें काम आहे असें समजावें.

७. घरांतील चाकरनौकर व आपल्या हातांखालीं काम करणारीं माणसें, आपल्या मुलांलेंकरांसारखीं आहेत असें जाणून घरांतील यजमानानें मोठ्या प्रेमानें त्यांचा संभाळ करावा.

८. ह्या मनुष्यांचा संभाळ करण्यासच परमेश्वरानें आपणास नेमिलें आहे, आणि ही कामगिरी आपण कशी काय बजाविली ह्याचा एके दिवशीं आपणास त्याजपाशीं जबाब द्यावा लागेल, हें प्रत्येक मनुष्यानें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

९. घरांतील यजमान चाकरमाणसांस त्यांच्या बापाच्या ठिकाणीं आहे व घरची गृहिणी त्यांच्या

आईच्या ठिकाणीं आहे. अशा रीतीनें वागविल्यास त्यांस परम संतोष होतो आणि ते मोठ्या आनंदानें व विश्वासानें धन्याची चाकरी करितात.

१०. नवीन चाकर ठेवतांनाच त्यास काय काय काम करावें लागेल, तें कोणत्या प्रकारचें आहे, वगैरे सर्व गोष्टी त्यास नीट समजावून सांगाव्या. तसेंच त्यानें नित्य किती वेळ काम करावयाचें, किती वेळ विश्रांति घ्यावयाची, दरमहा त्यास किती व कधीं वेतन मिळावयाचें, इत्यादि सर्व गोष्टी अगोदर स्पष्ट ठरवाव्या. असें केल्याशिवाय कोणासही चाकरीस ठेवूं नये.

११. नियमित वेळीं चाकराचा पगार द्यावा. तो आपणाकडे बाकी राहूं देऊं नये. चाकराचे पैसे आपणाकडे बाकी राहूं दिल्यानें एक तर आपण त्याचे ऋणकरी होतो. शिवाय, केलेला ठराव मोडिल्याचें पातक आपणांस लागतें तें निराळेंच. जवळ पैसा नसला ह्मणजे चाकर लोक दुसऱ्याचें कर्ज काढितात. तेंही न मिळालें तर धन्यास अथवा इतर कोणास फसवितात, चोऱ्या करितात, व शेवटीं एकाद्या संकटांत पडतात! ही त्यांची दुर्दशा होण्यास त्यांचा धनीच कारण होतो.

१२. इकडे धनी तर चाकराच्या पैशावर मौजा मारीत असतो! ह्याप्रमाणें गरीब बिचाऱ्या चाकराच्या तोंडची कोरडी मीठभाकर काढून त्यास अन्नान्न करावयास लावावें व त्याच्या निढळेच्या पैशावर आपण व आपल्या मुलांबाळांनीं यथेच्छ मजा मारावी हें महा दारुण पातक होय!

१३. अशा प्रकारची दुष्ट स्वार्थपरता, घोर अन्याय, व राक्षसी निर्दयता यांपासून परमेश्वर प्रत्येकाचें रक्षण करो!

१४. चाकरांस मोहपाशांत पाडूं नका. दीनदुर्बळांस मोहाच्या पाशांत पाडणें महा पापकर्म होय.

१५. चाकरांस नियमित काम देण्याचे ऐवजीं सर्व प्रकारचीं कामें दिलीं असतां आळसानें त्यांकडे दुर्लक्ष्य करण्याचा त्यांस मोठा मोह पडतो. यास्तव तीन चार माणसांचें काम एका मनुष्यावर सहसा लादूं नये.

१६. ज्यास अनेक कामें करावयाचीं असतात त्याकडून एकही काम नीट होत नाहीं. उलट धन्यास त्रास व अडचण हीं मात्र भोगावीं लागतात.

१७. पैसे, डागडागीने, मोलवान चीजवस्त जेथें उघडी हातास लागण्यासारखी पडली असेल तेथें चाकरास

पाठवूं नये. एकाएकीं त्याच्या विश्वासावर घर टाकूं नये. टाकिलें असतां त्यास चोरी करण्याचा मोह होतो.

१८. जे कोणी घरांतील चीजवस्त वारंवार पाहात नाहींत, पैशाची पर्वा न करितां त्याची उधळपट्टी करितात, चाकरमाणसांवर योग्य नजर न ठेवतां त्यांच्याशीं सलगीनें वागतात, अशा धन्याशीं चाकर लोक लबाडीनें वागतात. त्यास जुमानीत नाहींत, व सवड सांपडल्यास घरांतील चीजवस्त तत्काल नाहींशी करितात.

१९. धन्याच्या अव्यवस्थित व गैरशिस्त चालीमुळें अनेक विश्वासू चाकर लबाड व अप्रामाणिक झाले आहेत!

२०. अशा प्रकारचे धनी परमेश्वराचे व मनुष्याचेही अपराधी होतात. परमेश्वराच्या कृपेनें आपल्या हातीं आलेल्या माणसांस वाईट मार्गास लाविल्याबद्दल साक्षात् परमेश्वराचे, आणि आपल्या मानवबंधूंस मोहांत पाडून त्यांच्या आत्म्याचा सर्वस्वी नाश केल्याबद्दल मनुष्यांचे, असे उभयतांचेही ते घोर अपराधी होतात. खरोखर बे-पर्वा धनी व अप्रामाणिक चाकर, हे दोघेही ईश्वराच्या घरीं दंडास पात्र आहेत.

२१. नौकरचाकरांची निजावयाची जागा, दमट, ओ-

ल्सर, अथवा रोगी असूं नये. त्यांनां खावयास पोटभर अन्न, नेसावयास आंगभर वस्त्र, व निजावयास निवाऱ्याची जागा, ह्या सर्व गोष्टी असाव्या तशा आहेत कीं नाहींत याविषयीं धन्यानें नित्य चवकशी करावी.

२२. ते आजारी होऊन त्यांच्या जिवास बरें नाहींसें झाल्यास औषधपाण्याची नीट व्यवस्था करावी. कदापि हयगय करूं नये.

२३. सांगितलेलें न ऐकिल्यास, अथवा कामाची कोणत्याही प्रकारें हयगय केल्यास एकादे वेळीं चाकरांस रागें भरावें; परंतु तसेंच कांहीं विशेष काम हुकुमाप्रमाणें वेळेनुसार बजावल्यास त्यांशीं दोन गोड शब्द बोलून किंवा लहानसान देणगी देऊन त्यांस संतुष्ट करावें.

२४. सणावाराचे दिवशीं अथवा घरांत कांहीं कार्य झाल्यास चाकर लोकांस आपल्या सामर्थ्यानुरूप मिष्टान्न भोजन द्यावें.

२५. कधीं मधीं नवीं जुनीं वस्त्रें, घरांत आणिलेली फळफळावळ, प्रसंगानुसार पैसा अधेला इ० दिल्यास चाकरमाणसें सर्वदां संतुष्ट राहून धन्यास आशिर्वाद देतात.

२६. घरांमध्यें स्त्रिया चाकरीस ठेविलेल्या असल्या-

स्त्र पुरुष चाकरमाणसांस त्यांच्याशीं सलगी अथवा अमर्याद वर्तन करूं देऊं नये. असें न केल्यास धन्याचे घरास कलंक लागल्यावाचून राहाणार नाहीं.

२७. दारू, भांग, अफू इत्यादि मादक पदार्थांचें सेवन व हरएक प्रकारचें इतर दुराचरण, यांपासून चाकर माणसांचें मोठ्या सक्तीनें संरक्षण करावें.

२८. नौकर माणसांच्या चालीरीति अयोग्य व हलकट असतात. ह्मणून आपल्या मुलांलेंकरांस त्यांचा विशेष सहवास होऊं देऊं नये. त्यांच्या सहवासानें मोठमोठ्यांचीं मुलें बिघडून वाईट फंदांत पडल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

२९. वाईट चालीच्या व्यभिचारिणी स्त्रिया मोलकरणीच्या मिषानें बायकामुलांच्या कुटुंबांत चाकरीस राहून त्यांचा सर्वथैव नाश करितात. अशा दुष्ट स्त्रियांचें वारेंही आपल्या कुटुंबांत पडूं देऊं नये.

३०. चाकरमाणसांनीं नीतिमान व्हावें, सर्वांशीं इमानानें वागावें, व सर्वदा खऱ्या मार्गानें चालावें, अशाविषयीं आपणाकडून होईल तितका यत्न करावा.

३१. त्यांस लिहितां वाचतां येत असल्यास बोधपर

लहान लहान पुस्तकें, अल्पस्वल्प वर्तमान पत्रें त्यांस वाचावयास द्यावीं. अशा वाचनानें रिकामपणीं त्यांच्या मनास बोध व कर्मणूक होऊन त्यांचें चित्त वाईट मार्गाकडे वळत नाहीं.

३२. चाकरमाणसें परमेश्वराचें भजनपूजन करण्यांत गुंतलीं असतांना त्यांस काम सांगून त्यांच्या भक्तीचा भंग कधींही करूं नये.

३३. आपला भक्तिमार्ग त्यांस प्रशस्त वाटत असल्यास आपल्या उपासनेच्या वेळीं त्यांसही जवळ बसावें आणि त्यांच्याकडून ईश्वरभक्ति करवावी.

३४. सर्वसमर्थ परमेश्वर आपला धनी आहे व आपण सर्व मानवप्राणी त्याचे सेवक आहों; तो आपणांस किती मायेनें, दयेनें व प्रेमानें वागवीत आहे ! त्याचप्रमाणें आपणही आपल्या चाकरमाणसांवर सर्वदा दया, माया, व प्रेम केलें पाहिजे.



# संस्कार.

## १४.





सद्भक्तानें आपल्या घरांतील सर्व कार्यें अद्वितीय, अविनाशी परमेश्वराचें नामस्मरण करून करावीं.

२. मूर्तिपूजेसंबंधीं संस्कारांचा लवलेशही त्यांत नसावा.

३. तसेंच, आपले नातलग व इष्टमित्र यांचीं मनें संतुष्ट राखण्याकरितां ह्मणून कोणत्याही प्रकारचें प्रतिमापूजन करूं नये. त्याचप्रमाणें ज्यांच्यायोगें मनाची प्रवृत्ति मूर्त्तिपूजनाकडे होण्याचा संभव आहे, अशा प्रकारचे नवीन निरर्थक संस्कार उपस्थित करूं नयेत.

४. आपल्या धर्माची पवित्रता सर्वदां शुचिर्भूत राखावी. त्याच्या कोणत्याही विधींत अथवा संस्कारांत अधर्म अथवा थोतांड यांचा शिरकाव होऊं देऊं नये.

तसेंच, लहानमोठ्या सर्व कृत्यांत विवेकपूर्वक वागून आपलें मन निर्मल व पवित्र राखावें.

५. धर्मसंस्कारांत बाह्य आडंबर व व्यर्थ डामडौल नसावा.

६. कारण मनुष्याच्या मनास एकवार ह्या बाह्य कर्माची गोडी लागली ह्मणजे त्याची ह्या बाह्य कर्मावरच विशेष श्रद्धा बसते. अशानें मनुष्य कर्मठ होतो. कर्मठपणा हा आत्म्याच्या अंधपणाचें दर्शक होय.

७. सर्व संस्कार साधे व हृदयग्राहक असावे. त्यांचा अर्थ सर्वांस सहज समजे असा असावा.

८. ईश्वरास साधी भक्ति फार प्रिय असते. त्याच्या खऱ्या भक्तांस शुष्क कर्मकांडाचा कंटाळा येतो.

९. ज्या कर्मांत भक्ति नाहीं तीं सर्व व्यर्थ होत. तसेंच जे संस्कार बाह्य असतात त्यांत पुण्य अथवा पवित्रता यांचा लेशही नसतो.

१०. एकादा संस्कार कितीही सार्थ असला तरी केवळ त्या संस्काराच्या आंगीं आत्म्याचा उद्धार करण्याचें काडीमात्रही सामर्थ्य नसतें. तसेंच ज्या वस्तूंस आपण पवित्र असें समजतों त्यांच्यामध्यें पवित्रपणा नसतो.

११. सुगंधी धूप, सुवासिक पुष्पें, निर्मल उदक, भव्य निशाणें, आणि सुंदर चित्रें, हीं सर्व भक्तीचीं उपकरणें होत. अंतःकरणांत भक्तिभाव उदित करून तो वाढविण्यास हीं कारणीभूत होतात. तथापि, ह्यांच्याठायीं स्वतंत्रपणें कोणत्याही प्रकारची पवित्रता वास करीत नाहीं.

१२. ज्यांच्या त्यांच्या सोयीप्रमाणें व सवडीप्रमाणें ज्यांनीं त्यांनीं प्रत्येक संस्काराचा काळ व वेळ, स्थल व प्रसंग हे सर्व नेमावेत, तथापि अमुक काल शुभ व अमुक अशुभ, असें कदापि समजूं नये. ईश्वराच्या घरीं सर्व काल शुभ आहेत व सर्व स्थलें पवित्र आहेत.

१३. शास्त्रवाचन, कथापुराणश्रवण, स्नान, दान, इत्यादिकांचा यथायोग्य उपयोग केल्यास त्यांच्यायोगें आत्म्याचें पुष्कळ कल्याण होईल. परंतु केवळ ह्यांच्याच योगें सद्गति प्राप्त होते असें कोणींही मानूं नये.

१४. सारांश, निवळ संस्कारांच्या आंगीं कोणत्याही प्रकारचा पवित्रपणा नाहीं. शुद्ध मनानें ते केले असतां मनावर त्यांचा परिणाम अत्यंत पवित्र होतो. यास्तव, धर्मसंबंधीं सर्व क्रिया व संस्कार सद्भावानें व गांभीर्यानें

करावेत. ज्याविषयीं आपल्या मनांत पूज्यभाव नाहीं तें कर्म लोकभीतीस्तव अथवा लोकप्रीतीस्तव सहसा आचरूं नये.

१५. घरामध्यें एकादें कार्य अथवा संस्कार कर्तव्य झाल्यास तो यथासांग, यथाविधी करावा. त्यांत कोणत्याही प्रकारची उणीव पडूं देऊं नये. असें केल्याशिवाय त्याचें महत्व समजत नाहीं, व महत्व न समजल्यास त्यापासून जो कांहीं कार्यभाग व्हायाचा तो होत नाहीं.

१६. ह्या पवित्र **नवविधान** धर्माच्या सर्व अनुयायांनीं प्रत्येक संस्कार, निदान मुख्य मुख्य गोष्टींच्या संबंधानें तरी, एक सारख्या रीतीनें करावा. देशाचार, कुलाचार, व्यक्तिमात्राची आवडनावड ह्यांवर अवलंबून असणाऱ्या ज्या कांहीं गौण गोष्टी आहेत त्यांसंबंधानें थोडें बहुत अंतर पडल्यास चिंता नाहीं.

१७. ह्याप्रमाणें "एकमेवाद्वितीयं" अशा परमेश्वराचे जे कोणी पूजक आहेत त्यांच्या धर्मविचारांत जसें ऐक्य आहे, तसेंच त्यांच्या धर्माचारांत व धर्मसंस्कारांतही ऐक्यच असलें पाहिजे.



# जातकर्म अथवा जन्मोत्सव.

## १५.

घरांमध्यें मूल जन्मलें असतां घरांतील सर्व माणसांनीं आनंद करावा.

२. हा आनंदाचा प्रसंग मोठ्या उत्साहानें आणि समारंभानें गाजवावा.

३. बालकाचा जन्म मोठ्या उत्सवाचा प्रसंग होय. अंतरालांत नुक्तेंच उदयास आलेलें एकादें तेजःपुंज नक्षत्र अवलोकन करून अंतःकरणास जसा अवर्णनीय आनंद होतो, त्याचप्रमाणें नूतन बालक जन्मास आलेलें पाहून त्याच्या मातापितरांस अलौकिक आनंद होतो. ह्या आनंदाच्या प्रसंगीं परमेश्वरास विसरतां कामा नये.

४. नूतन बालक परमेश्वराची अतिश्रेष्ठ देणगी—

त्याच्या अनंत कृपेचें उत्कृष्ट दर्शक होय.

५. लहान बालकांच्या मनांत पवित्रता वास करिते. त्यांच्या मुखचंद्रावर ईश्वरी प्रभा नांदत असते.

६. अशा प्रकारचा पवित्र प्राणी ज्या गृहीं जन्मास येतो, त्या गृहीं अवश्य आनंदोत्सव असावा.

७. त्या लहान बालकाचीं मातापितरें, बहिणभाऊ, इष्टमित्र, शेजारीपाजारी ह्या सर्वांनीं महोत्सव करावा, आणि परमेश्वरानें कृपालु होऊन हें अपत्यरत्न आपणास दिलें ह्मणून त्याची स्तुति करावी.

८. मूल जन्मल्यानंतर दायीनें त्याचें सर्वांग निर्मल धुवावें, आाणि त्यास स्वच्छ शुभ्र वस्त्रानें गुंडाळून मातेच्या अंकावर ठेवावें.

९. आपल्या अपत्यरत्नाचें मुखकमल अवलोकन करून आईनें प्रेमभरित अंतःकरणानें त्याचें चुंबन करावें.

१०. नंतर नेत्र निमीलित करून शांत चित्तानें परमेश्वराची स्तुति करावी कीं.—दयाघन प्रभु, तुझ्या कृपेनें प्राप्त झालेल्या ह्या अपत्यरत्नाचें मुखकमल अवलोकन करून ही तुझी दीन दासी धन्य झाली ! तुझा हा मजवर अतिश्रेष्ठ अनुग्रह होय. मंगलमय पित्या, ह्या बाल-

कास आशिर्वाद दे; आणि ह्यास सर्वस्वी आपलें कर.

११. तदनंतर बापानें बालकास अवलोकन करावें आणि ईश्वराची स्तुति करावी.

१२. कांहीं काल गेल्यानंतर भावंडांनीं, जवळच्या आप्तांनीं, व इष्टमित्रांनींही मुलास पहावें आणि त्याचें कल्याणार्थ ईश्वराचा आशिर्वाद मागावा.

१३. मुलाच्या जन्मदिवसापासून एक महिनापर्यंत त्यास व त्याच्या आईस एकांत व शांत स्थलीं ठेवावें. उभयतांसही फार जपावें व त्यांची उत्तम जतन करावी. वैद्य सांगेल त्याप्रमाणें औषधपाणी देऊन त्यांचा सांभाळ करावा.

१४. एक महिना झाल्यावर मुलाचें **जातकर्म** अथवा जन्मोत्सव करावा.

१५. जातकर्माप्रीत्यर्थ नेमिलेल्या दिवशीं कुटुंबांतील उपासनास्थान पुष्पांनीं व वेलींनीं सुशोभित करावें. त्या दिवशीं सर्व इष्टमित्रांस उपासनेकारितां पाचारण करावें.

१६. नित्योपासनेचा पूर्वभाग संपल्यावर मुलाच्या बापानें प्रार्थना करावी.—

१७. हे करुणामय प्रभो, हें बालक तुझा कृपाप्रसाद होय. मातेच्या उदरांत नऊ महिनेपर्यंत अतर्क्य चातुर्यानें यास तूं वाढविलेंस, ह्याच्या दुर्बल अवस्थेंत आजपर्यंत तूंच ह्याचें संरक्षण केलेंस, आणि ह्या पुढेंही तूंच रक्षण करणार. प्रभो, तुझ्या कृपेस पार नाहीं! दयालु होऊन हें बालकरत्न जसें तूं आह्मांस दिलेंस तसेंच सर्व संकटांपासून व रोगांपासून तूं ह्याचें रक्षण कर. ह्या प्रिय बालकाच्या संबंधें माझें काय कर्तव्य आहे हें मला शिकीव आणि तें शक्त्यनुसार बजावण्याचें सामर्थ्य दे. मी अत्यंत अज्ञानी व परम दुर्बल आहें. ह्याचें संगोपन करणें, ह्याच्या ठायीं भक्तिभाव उत्पन्न करणें, व ह्याच्या हातून तुझी सेवाचाकरी करविणें, इत्यादि परम कठिण गोष्टी तुझ्या प्रसादावांचून माझ्या हातून कदापि व्हावयाच्या नाहींत. ह्या तूंच माझ्या हातून घडीव. ह्या बाळास तुझा मंगल आशिर्वाद दे. तूंच ह्याची माता, तूंच ह्याचा पिता, आणि तूंच ह्याचा सखा. आपल्या कृपाछत्रा खालीं ह्यास तूं सदैव राख. ह्या बालकास आपल्या मधुमय अंकावर सर्वकाल घेऊन बैस, ह्मणजे ह्यास कोणत्याही प्रकारची बाधा होणार नाहीं. जननी, ह्यावर असा अनुग्रह कर कीं हें मोठें झाल्यावर आपल्या

कुलास सर्व प्रकारें भूषण होऊन मातापितरांच्या अंतः-करणास संतोष देईल. ह्याच्या सकल इच्छा, विचार, आणि आचार मंगल होतील असें कर.

१८. ह्यानंतर उपासकानें आशिर्वचन ह्मणावें, व शेवटीं सर्व भक्तजनांनीं "शांतिः शांतिः शांतिः" असें त्रिवार उच्चारावें.

१९. नंतर प्रसंगास अनुरूप असें एकादें पद्य ह्मणून उत्सवाची परिसमाप्ति करावी.



# नामकरण.

अथवा

## मुलाचें नांव ठेवणें.

### १६.

मूल सहा महिन्याचें झाल्यावर त्याचें नांव ठेवावें.

२. निश्चित दिवशीं प्रातःकालीं मुलास मंगलस्नान घालावें.

३. स्नानाचे अगोदर त्याच्या सर्वांगास सुगंधि तैल लावावें, व मस्तकास शीतल व सुवासिक तेल चोळावें. नंतर स्वच्छ पात्रानें उष्णोदकाचें स्नान घालावें, व सर्वांग निर्मल धुऊन काढावें. ह्याप्रमाणें अभ्यंगस्नान झाल्यावर सर्वांग कोरडें करावें.

४. तदनंतर त्यास नवीन वस्त्रें घालावीं. मातापित-

रांच्या सामर्थ्यानुरूप त्याच्या आंगावर अलंकारभूषणें घालावीं. आंगावरील अलंकार साधे व बेताचे असावेत.

५. आपल्या देशाचारास अनुसरून, मुलाच्या कपाळीं चंदनतिलक लावावा.

६. मुलाचें अभ्यंगस्नान व वस्त्रालंकारपरिधान हे विधि होत असतां, आपल्या देशचीं जीं कांहीं मंगल वाद्यें आहेत तीं वाजत असावीं.

७. ह्या प्रसंगीं सर्व गृह धुऊन सारवून स्वच्छ केलेलें असावें. ज्या ठिकाणीं **नामकरणसंस्कार** करावयाचें ठरलें असेल तें स्थान सुंदर पुष्पांच्या वेली, तोरणें, रंगीबेरंगी निषाणें यांच्या योगें सुशोभित करावें. निमंत्रण केलेले सर्व आप्त व सुहृज्जन यांस त्या मंगल स्थानीं नेऊन बसवावें.

८. मुलाचीं मातापितरें ज्या समाजाचीं असतील त्या समाजाचा आचार्य, अथवा कोणी धर्मप्रचारक— आणि तोही नसल्यास—समाजापैकीं एकादा पोक्त धर्मबंधु अशा गृहस्थाची ह्या प्रसंगीं उपाध्यायाचे जागीं योजना करावी.

९. उपाध्यायानें प्रथमतः ईश्वरोपासना करावी. ति-

चा पूर्वभाग संपल्यावर बालकास बाहेर आणवावें.

१०. मुलाच्या बापानें मुलास बाहेर न्यावें व त्यास हातांवर घेऊन व्यासपीठासमोर उपासकाच्या सन्मुख उभें राहून प्रार्थना करावी.

११. ती अशी.—हे जगत्कारण जगदात्मन् परमेश्वर, आह्मां ब्राह्मबालकांची गृहदेवता तूं. तस्मात् हें माझें प्रिय बालक मी तुला अर्पण करितों. आह्मीं ह्याचीं मानवीं मातापितरें अति दुर्बल आहों! आह्मांकडून ह्याचें संरक्षण कसें होणार? अति बलहीन, अत्यंत कोमल अवस्थेमध्यें नानाप्रकारच्या संकटांपासून ह्याचें तूंच रक्षण केलेंस. मातेच्या स्तनीं अमृतमय दुग्ध उत्पन्न करून त्याजवर ह्याच्या कोमल देहाचें तूंच पोषण केलेंस. कारुणिक जननी, तुझ्या ममतेस सीमा नाहीं! वत्सल माते, ह्या बाळाचें आजपर्यंत रक्षण करून ह्याचें नांव ठेवण्याचा मंगल विधि करण्याचा सुप्रसंग तूंच आणिलास! ह्याकालपर्यंत आईच्या दुधावर ह्याच्या देहाचें पोषण झालें. आजपासून हें बालक अधिक सत्वशील अन्न भक्षण करणार. हें अन्न पवित्र कर. ह्यास पावन कर. हें बाळ मोठें होऊन यास समजूं लागल्यावर याच्या सर्व इच्छा, सर्व मनोवासना मंगल होतील असा आशिर्वाद दे. हें बालक

आमचें नाहीं; तुझें होय. सदैव तूं ह्याच्या सन्निध ऐस. ह्याचा संभाळ कर. ह्यास कळूं लागल्यावर ह्याच्या हातून अंतःकरणपूर्वक तुझी सेवा होईल असें कर. आह्मी पामरांनीं तुजजवळ आणखी काय मागावें? तूं सर्वज्ञ सर्वसमर्थ आहेस. ह्या बालकाचें पूर्ण कल्याण होईल असें कर, हीच तुजजवळ प्रार्थना आहे.

१२. ह्याप्रमाणें प्रार्थना केल्यावर बापानें मुलास उपाध्यायाचे जवळ द्यावें आणि त्याचें नांव काय ठेवावयाचें असेल तें त्यास सांगावें. उपाध्यायानें मूल आपणाजवळ घेऊन त्याचें नांव ठेवितांना ह्मणावें.—

परमसमर्थ परमेश्वरासमोर व त्याच्या ह्या भक्तजनांसमोर श्री * * * ह्यांचा पुत्र (अथवा कन्या) ह्याचें (अथवा हिचें) श्रीमत (अथवा श्रीमती) * * * असें नाम ठेवितों! परात्पर परमात्मा ह्या बालकाचें रक्षण करो!

१३. इतकें ह्मटल्यावर उपाध्यायानें मुलाच्या गळ्यांत पुष्पांचा हार घालावा.

१४. नंतर सर्व भक्तसमूहानें "शांतिः शांतिः शांतिः" असें त्रिवार ह्मणावें.

१५. ह्याप्रमाणें नामकरणविधि आटोपल्यावर मुलाचें उष्टावण करावें.

१६. नामकरणविधि झाल्यावर इष्टमित्रांनीं मुलास अमळ आपल्याजवळ घ्यावें; व तदनंतर त्याच्या बापानें त्यास अंतर्गृहांत नेऊन त्याच्या आईच्या स्वाधीन करावें. तिनें त्यास घेऊन जमलेल्या सर्व स्त्रियांसमवेत मध्यगृहांत जावें. हें स्थल त्या दिवशीं उत्तम रीतीनें शृंगारिलेलें असावें. सर्व स्त्रीमंडल येऊन बसल्यावर खोलीच्या मध्यभागीं एक सुंदर चौरंग ठेवून त्यावर मुलास बसवावें.

१७. चौरंगासमोर उत्तम उत्तम पक्वान्नांनीं व फलांनीं भरलेल्या दहा बारा वाट्या एका ताटांत मांडून ठेवाव्या.

१८. ह्यांपैकीं एका वाटींत तांदळाचा भात असावा. त्यांत दूध घालून त्याचीं तीन चार शितें आईनें मुलाच्या तोंडांत घालावीं. तीं घालतांना म्हणावें—"बाळा, हें अन्न मी तुला खाऊं घालितें. ह्याच्या योगें परमेश्वर तुझ्या शरिराचें व आत्म्याचें संरक्षण करो!"

१९. नंतर आईनें दुसऱ्या दोन तीन वाट्यांतील पक्वान्नें मुलास बोटानें चाटवावीं.

२०. ह्याप्रमाणें आईनें मुलाचें उष्टावण केल्यावर तेथें जमलेल्या स्त्रियांपैकीं दोन तीन पोक्त स्त्रियांनीं दुसऱ्या कित्येक वाट्यांतील मिष्टान्नें मुलास चाटवावीं.

२१. मुलाचा हा अन्नसंस्कार होत असतां, बाहेर मंगलवाद्यें वाजवावीं; आणि घरामध्यें मुलाजवळ जमलेल्या स्त्रियांनीं गाणीं ह्मणावीं.

२२. ह्याप्रमाणें अन्नसंस्कार संपल्यावर बापानें मुलास पुनः बाहेर पुरुषमंडळींत आणावें. तेव्हां इष्टमित्रांनीं त्यास वस्त्रालंकार, भूषणें यांच्या देणग्या द्याव्या, आणि मुलाचें अभिवाद चिंतन करून त्यास आशिर्वाद द्यावे.



# दीक्षा अथवा धर्मपरिग्रह.

## १७.

प्रत्येक ब्राह्म गृहस्थानें आपल्या मुलांस व मुलींस लेखनवाचनादि सर्व प्रकारचें उपयुक्त शिक्षण ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें व सामर्थ्याप्रमाणें अवश्य द्यावें.

२. मुलांस चांगलें समजूं लागल्यावर स्वतः अथवा दुसऱ्या एकाद्या योग्य गुरूकडून त्यांस ब्राह्मधर्माचीं मुख्य मुख्य मतें शिकवावीं. तसेंच ब्राह्मधर्मसंबंधीं जीं कांहीं उत्तम उत्तम पुस्तकें असतील तीं त्यांच्याकडून वाचवावीं व त्यांस त्यांचा अर्थ सांगावा.

३. ह्याप्रमाणें पुत्राचें धर्मशिक्षण पूर्ण झाल्यावर व त्याच्या वयास सोळा वर्षें पुरीं झाल्यावर त्यास ब्राह्मधर्मदीक्षा द्यावी आणि ब्राह्म करावें. मुलास ही दीक्षा

त्याच्या विवाहाच्या अगोदर द्यावी. ही दिल्याशिवाय पुत्राचा विवाह करूं नये.

४. हा दीक्षाविधि ब्राह्ममंदिरांत किंवा आपल्या घरीं उपासनेच्या ठिकाणीं करावा.

५. ह्या विधीप्रीत्यर्थ निश्चित केलेल्या दिवशीं प्रातः-कालीं मुलानें अभ्यंगस्नान करून शुचिर्भूत व्हावें.

६. मुलाचें स्नान संपत आलें ह्मणजे बापानें अथवा घरांतील कोणीं वडील माणसानें नवविधाननिशाणमुद्रित अशा पात्रानें त्याच्या मस्तकावर उदक सिंचन करावें.

७. पिता मस्तकावर पाणी ओतीत असतां पुत्रानें ह्मणावें.—"निर्मल उदकाच्या द्वारें ज्याप्रमाणें परमेश्वर माझें हें शरीर धुऊन स्वच्छ करीत आहे, त्याचप्रमाणें तो माझ्या अंतःकरणाचें क्षालन करून त्याचा सर्व पापमल धुऊन टाको. ह्या शांतिजलाच्या योगें जसा माझ्या देहाचा सर्व ताप नाहींसा होतो, तद्वत परमेश्वर आपलें कृपावारी सिंचन करून माझ्या अंतःकरणास शांति देवो."

८. हा शांतिजलसंस्कार संपतां क्षणींच दीक्षार्थी

पुत्रानें, त्याच्या पित्यानें, व सन्निध असणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं "शांतिः शांतिः शांतिः" असें ह्मणावें.

९. ह्याप्रमाणें मुलाचें स्नान झाल्यावर त्यानें शुभ्र वस्त्रें परिधान करावीं व आंगावर भगवें आंगवस्त्र घ्यावें. अशा पोषाखानें इष्टमित्रांसह उपासनास्थानीं जावें व व्यासपीठासमोर कांहीं अंतरावर उपासकाच्या सन्मुख चौरंग ठेविलेला असेल त्यावर बसावें.

१०. उपाध्यायानें उपासनेस प्रारंभ करावा आणि उपासनेचा प्रथम भाग संपल्यावर दीक्षार्थी मुलास आपणाजवळ बोलवावें.

११. तदनंतर मुलाच्या बापानें अथवा घरांतील कोणीं पोक्त गृहस्थानें मुलास बरोबर घेऊन उपाध्यायासन्मुख वेदीसमोर उभें राहावें आणि ह्मणावें.—"आचार्य महाराज, श्रीमन * * * हे ब्राह्मधर्माची दीक्षा घेण्याच्या इच्छेनें आपणासमोर आले आहेत. दीक्षा घेण्यास ते योग्य आहेत असें मला वाटतें. आपणास उचित दिसत असल्यास त्यांजवर आपण दीक्षादानाचा अनुग्रह करावा."

१२. तदनंतर आचार्यांनीं दीक्षेच्छूस विचारावें—

**आचार्य.**—दीक्षार्थी, तुह्मीं ह्या पवित्र ब्राह्मधर्माची दीक्षा घेण्याचा निर्धार केला आहे काय ?

**दीक्षार्थी.**—होय, आचार्य.

**आ॰**—ब्राह्मधर्माचीं अनादिसिद्ध मूलतत्वें आपणांस माहीत आहेत काय ? त्यांवर आपला पूर्ण विश्वास आहे काय ?

**दी॰**—होय, आचार्य.

**आ॰**—ही धर्मदीक्षा स्वीकारण्याविषयीं तुह्मांस ईश्वरी प्रेरणा झाली आहे काय ?

**दी॰**—होय महाराज; झाली आहे.

**आ॰**—संसारांतील नित्यकर्में ब्राह्मधर्मानुसार करण्यास तुह्मीं तयार आहां काय ?

**दी॰**—होय, आचार्य, तयार आहें; मज पामराची इच्छा अंशरूपानें तरी सफल करण्यास प्रभु समर्थ आहे.

**आ॰**—परमेश्वर एक, अद्वितीय, व सर्वव्यापी आहे; तो अनंत, अव्यंग, सर्वसमर्थ, परमपवित्र, आनंदमय, दयासागर, मंगलनिधि, सृष्टिस्थितिलयकर्ता असा आहे; मनुष्यमात्राचा परम श्रेष्ठ पिता, माता, मित्र, बंधु, गण-

गोत सर्व कांहीं तो; तोच एक भक्तवत्सल, पूजनीय, वंदनीय, आणि आराध्य असें तुह्मीं मानितां काय ?

दी०—होय; असा माझा अचल विश्वास आहे.

आ०—आत्मा अमर आहे व तो अनंत कालपर्यंत उन्नतशील आहे, असा तुमचा विश्वास आहे काय ?

दी०—होय, आचार्य.

आ०—मनोदेवतेच्या द्वारें परमेश्वर आपली इच्छा मनुष्यमात्रास कळवितो व विवेकाच्या द्वारें मनुष्यास सत्यासत्याचें पूर्ण ज्ञान होतें असें तुह्मीं मानितां काय ? इहलोकीं मनुष्यमात्र जें कांहीं बरें वाईट कर्म आचरितात त्या सर्वांचा त्यांस मृत्यूनंतर परमेश्वरापाशीं झाडा द्यावा लागेल; व मनुष्यास सत्कर्माबद्दल ईश्वरकृपा, आणि पापकर्माबद्दल कठिण शासन, इहलोकीं व परलोकींही प्राप्त होतात असा तुमचा विश्वास आहे काय ?

दी०—होय, आहे.

आ०—परमेश्वराचा सत्य धर्म सार्वत्रिक आहे; त्यामध्यें पृथ्वीवरील सर्व धर्मांचें, सर्व शास्त्रांचें व सर्व प्रकारच्या ज्ञानाचें पूर्ण ऐक्य होतें; नाना देशांतील संत, महंत, ऋषी, मुनी, योगी, आणि धार्मिक पुरुष ह्यांच्या

शिक्षणाचें द्वृत एकच आहे; त्यांत वास्तविक भिन्नभाव नाहीं; सरळ विचार, अचल विश्वास, शुद्ध भक्ति, खरा योग, सात्विक वैराग्य, अखंड कर्तव्यतत्परता हीं सर्व ह्या सत्यधर्माचीं अवश्य अंगें होत; सकल मानवप्राणी एकाच परमेश्वराचीं मुलें, अतएव धर्माच्या नांवानें निरनिराळे पंथ करून त्यांनीं एकमेकांशीं कलह करणें, परस्परांचा छल करणें हें परमेश्वरास सहसा प्रिय होणार नाहीं, असा तुमचा दृढ विश्वास आहे काय ?

दी०—होय. माझा असा पूर्ण विश्वास आहे.

आ०—विचारी मनुष्यास विवेकद्वारें ईश्वराच्या इच्छेचें ज्ञान होतें; तसेंच विशेष प्रसंगीं साधु पुरुषांस परमेश्वराचा साक्षात आदेश होतो, असें तुह्मी मानितां काय? परमेश्वर सर्वत्र सर्व प्रसंगीं आहे; तो या विशाल विश्वाचे सर्व लहानथोर व्यापार चालवितो; मनुष्यमात्रांशीं त्याचा अति निकट संबंध आहे, असा तुमचा विश्वास आहे काय?

दी०—होय आहे.

आ०—जगांतील धर्मशास्त्रांस तुह्मी मानितां काय ? त्यांवर तुमची श्रद्धा आहे काय ?

दी०—मनुष्यमात्रास धर्ममार्गाचें ज्ञान करून देण्या-

करितां निरनिराळ्या कालीं व निरनिराळ्या देशांत परमेश्वरानें निरनिराळे साधु पुरुष उत्पन्न केले. त्यांच्या सोज्वळ उक्ती ह्या धर्मग्रंथांतून लिहून ठेविल्या आहेत. ज्या ज्या मानानें त्या शुद्ध व अबाधित असतील त्या त्या मानानें मी ह्या ग्रंथांचा आदर करितों.

**आ**०—जगामध्यें आजपर्यंत जे जे साधु पुरुष होऊन गेले त्यांस तुह्मी मानितां काय? त्यांजवर तुमची श्रद्धा आहे काय?

**दी**०—साधु पुरुष कितीही पवित्र असला तरी तो प्रत्यक्ष ईश्वराचा निष्पाप, निष्कलंक अवतार असें मी मानीत नाहीं. त्याच्याठायीं ईश्वराचा सात्विकस्वभाव ज्या ज्या अंशानें वास करीत असेल त्या त्या अंशानें तो पुरुष मला आदरणीय, असें मी समजतों. त्याच्या स्वभावांत, आचारविचारांत जें कांहीं शुद्ध व ईश्वरी असेल तें सर्व अनुकरणीय, त्याचा अवश्य अंगिकार करावा असें मी मानितों.

**आ**०—तुमची श्रद्धा कशावर आहे?

**दी**०—ज्याच्यायोगें अंतरात्म्यास शाश्वत आनंदलाभ होतो, असें जें परमात्म्याचें पूर्ण ज्ञान त्यावर माझी श्रद्धा आहे.

आ०—तुमचें शास्त्र कोणतें ?

दी०—मनुष्यमात्रास पावन करणारें परमेश्वरप्रेम, हेंच माझें शास्त्र.

आ०—तुमचा स्वर्ग कोणता ?

दी०—विवेकपूर्वक वागल्यानें सर्वांस प्राप्त होणारा जो मधुमय ईश्वरसहवास तोच माझा स्वर्ग.

आ०—खरा ईश्वरभक्त होण्यास कोण कोणते गुण आंगीं असावे लागतात ?

दी०—सत्य, प्रेम, आणि पवित्रता हीं आंगीं असल्याशिवाय खरी ईश्वरभक्ति होत नाहीं. हीं ज्याच्या आंगीं आहेत तोच परमेश्वराच्या ब्रह्मराज्याचा अधिकारी होतो.

आ०—तर आतां परमेश्वरासमोर प्रतिज्ञा करून ह्या पवित्र ब्राह्मधर्माचा स्वीकार करा.

दी०—आज, रोज * * * ता० * * वी, माहे * * सन * * * या शुभ दिवशीं मंगलमय परमेश्वरासमोर मी प्रतिज्ञा करून सांगतों कीं, त्याच्या पवित्र ब्राह्मधर्मावर माझा पूर्ण विश्वास आहे. त्याचा उघडपणें स्वीकार करणें, हें माझें परम श्रेष्ठ कर्त्तव्य आहे. तें मजकडून

यथाशक्ति व्हावें एतदर्थ मी ब्राह्मसमाजाचा सभासद होतों. परमेश्वर मला साह्य होवो!

**आ०**—सर्व प्रकारचा असत्यभाव, अपवित्रपणा, आणि मिथ्याभिमान यांपासून सावधपणें दूर राहा; अंतःकरणामध्यें भक्तिभाव वाढवून आपले आचारविचार सर्वदां मंगल ठेवा; जेणेंकरून परमेश्वराचे गौरव होतील व त्याच्या पवित्र धर्माचा महिमा वाढेल अशा रीतीनें सर्व प्रसंगीं वागा, असें परमेश्वराच्या नांवानें मी आपणास सांगतों!

**दी०**—दयामय परमात्मन्, मजकडून सर्वदां सत्याचरण होईल, आणि ज्याच्या योगें तुझ्या पवित्र भक्तमंडलास कलंक लागेल अशा प्रकारचें कुकर्म मजकडून न होईल असा मंगल अनुग्रह मजवर कर! [अशी प्रार्थना करून दीक्षार्थी गृहस्थानें परमेश्वरास नमस्कार करावा.]

**आ०**—सर्वसमर्थ प्रभु तुमचा पाठिराखा होवो, आणि तुमचें संरक्षण करो!

ह्याप्रमाणें दीक्षासंस्कार आटोपल्यावर आचार्यानें ह्या नूतन ब्राह्मास "नवविधान" हीं अक्षरें ज्यावर काढिलीं आहेत, असें एक निशाण द्यावें, आणि समा-

जाच्या नांवानें दोन पोक्त सभासदांनीं "शास्त्रवचनें" आणि "नवसंहिता" हीं दोन पुस्तकें, तसेंच नित्योपासनेप्रीत्यर्थ एक आसन इतक्या देणग्या द्याव्या आणि त्यास बंधुप्रेमानें आलिंगन द्यावें.

तदनंतर, दीक्षा प्राप्त झालेल्या गृहस्थानें सद्भावपूर्वक ईश्वरास नमस्कार करावा. नंतर सर्व समाजानें गंभीर वाणीनें "ब्रम्हकृपाहि केवलं" असें म्हणून "शांतिः शांतिः शांतिः" असें त्रिवार उच्चारावें.



# विवाह अथवा लग्नसंस्कार.

## १८.



वयांत आल्याशिवाय मुलाचा अथवा मुलीचा विवाह करूं नये.

२. लहानपणीं लग्न केल्यानें उभयतां वधुवरांचेंच शारिरीक व मानसीक अकल्याण होऊन राहात नाहीं. त्यांच्यापासून होणारी प्रजा दुर्बल, अशक्त व निस्सत्व निपजल्या कारणानें एकंदर लोकसमाजाचें अनहित होऊन साऱ्या देशाचें अनिवार्य अकल्याण होतें. अतएव, बालविवाह हा परमेश्वराच्या मंगल इच्छेस सर्वथैव असंमत—ह्मणून अर्थात एक प्रकारचें पातक होय.

३. स्त्रियांची कौमार्यावस्था अत्यंत पवित्र होय. ती जो कोणी भ्रष्ट करितो त्यास अधमाधम नरपशु समजावें. त्याच्या पातकास सीमा नाहीं.

४. निरनिराळ्या देशांतील हवापाण्याच्या मानास अनुसरून स्त्रीपुरुषांचा विवाहकाल ठरवावा. अशा गोष्टींत सृष्टिनियम हीच ईश्वराची आज्ञा समजावयाची.

५. स्वेच्छेच्या भरीस पडून मनुष्यानें फार लवकर अथवा फार उशिरां विवाह करूं नये. देहस्वभावानुरूप शरीर आणि मन परिपक्व दशेस आलें ह्मणजे विवाह करण्यास प्रवृत्त व्हावें.

६. विवाहकाल ठरवावयाचा तो केवळ वय आणि देशांतील हवेचें मान एवढ्यावरूनच ठरवूं नये. व्यक्तिमात्राची शरीरप्रकृति, स्वभाव, शिक्षण, वर्तन, आणि द्रव्याच्या संबंधानें त्याची स्थिती, ह्या सर्व गोष्टींचा नीट विचार करून असुक मनुष्यानें विवाह केव्हां करावा हें ठरवावें.

७. विवाह करावयाचा तो विषयवासना तृप्त करण्याकरितां अथवा आपल्या ऐहिक सुखसोयीकरितां नव्हे. ह्मणून पत्नी पसंत करावयाची ती तिच्या बाह्यसौंदर्यावरून, अथवा तिच्या द्वारें प्राप्त होणाऱ्या धनावरून, पसंत करूं नये. अशा कामीं स्वतः विवेकपूर्वक विचार करावा व मातापितरांचा किंवा सुज्ञ इष्टमित्रांचा अवश्य विचार घ्यावा.

८. विवाहाच्या कामीं अविचार आणि उतावळी करून बहुतांनीं आपल्या हातानें आपला नाश करून घेतला आहे. यास्तव तरुण स्त्रीपुरुषांनीं फार सावध राहिलें पाहिजे.

९. तरुण वधुवरांची इच्छा आणि घरांतील वडील माणसांचा पोक्त विचार या दोहोंसही संमत असणारा विवाहसंबंध उभयतांसही कल्याणकारक होतो.

१०. स्त्रीपुरुषांनीं आपणास अनुरूप पतिपत्नी पाहावी आणि घरांतील वडील माणसांची संमति प्राप्त करून घ्यावी; अथवा वडील माणसांनीं अनुरूप वधुवरें पाहावीं आणि आपल्या मुलांमुलींला तीं मान्य होतात कीं नाहीं हें पहावें.

११. विवाह होण्याच्या अगोदर भावी वधुवरांनीं एकमेकांचा स्वभाव, आवडनावड, वर्त्तणूक वगैरे सर्व गोष्टींविषयीं स्वतः किंवा मातापितरांच्या द्वारें पूर्ण माहिती करून घ्यावी. मुलें जाणतीं व समजुतदार असल्यास त्यांच्या वारंवार भेटी होऊन परस्पर संभाषण व्हावें.

१२. अशा प्रकारच्या भेटीचे व संभाषणाचे प्रसंग वडील माणसांच्या संमतीनें त्यांच्या समोर व्हावेत,

त्यांच्या पश्चात् ह्मणजे त्यांना नकळत सहसा होऊं नयेत. तसेंच अशा प्रसंगीं परस्परांची विशेष सलगी कदापि होऊं देऊं नये.

१३. तरुण मनुष्यांच्या आंगीं फारसें आत्मसंयमन नसतें. ह्यामुळें अशा प्रसंगीं तरुण स्त्रीपुरुषांचा विशेष सहवास झाल्यास उभयताही भ्रष्ट होऊन पतन पावतात. शेवटीं जगामध्यें अब्रूस कलंक न लागावा ह्मणून आपल्या पातकावर विवाहाचें पांघरूण घालूं पहातात. परंतु अशानें पापकर्म झांकलें जात नाहीं.

१४. असले विवाह पापमूलक होत. त्यांच्या योगें स्त्रीपुरुषांचें अकल्याण होतें, उभयकुलांच्या सत्कीर्तीचा नाश होतो व लोकनीतीचा ऱ्हास होतो. ह्मणून विवाहेच्छु वधुवरांच्या मातापितरांनीं व वडील माणसांनीं फार सावध असलें पाहिजे.

१५. पतन होऊन पापमार्गास लागलेल्या स्त्रीपुरुषांस अनुताप होऊन तीं जर सन्मार्गाचें अवलंबन करूं इच्छीत असतील तर त्यांनीं विवाह करावा. परंतु त्यांचा अनुताप अंतःकरणपूर्वक असला पाहिजे. अशा प्रकारें पापसमुद्रांत नष्ट झालेल्यांस हात देऊन वर ओढून

काढण्यासारखें सत्कर्म नाहीं. परंतु तें करितांना स्वतहाच्या आत्म्यास कलंक न लावून घेण्याविषयीं फार जपलें पाहिजे.

१६. पुरुषास एकच पत्नि असावी, आणि स्त्रीसही एकच पति असावा.

१७. पुरुषास एकाहून अधिक बायका असणें व स्त्रीस एकाहून अधिक पति असणें ह्या दोन्हीही चाली अति निंद्य होत. ब्राह्मसमाजांत त्यांस स्थान नाहीं. विवाहित स्त्री नावडती, कुरूप, रोगग्रस्त, वंध्या, किंवा व्यभिचारीणी कशीही असो, ती टाकून पुरुषानें अन्य स्त्रीशीं सहसा विवाह करूं नये. तसेंच विवाहित पति द्वाड, दुष्ट, दुर्व्यसनी, अथवा बाहेरख्याली, कसाही असो, त्यास सोडून स्त्रीनेंही अन्य पति करूं नये.

१८. विवाहित स्त्रीपुरुषांनीं कोणत्याही कारणावरून काडी मोडून देऊन विवाहमुक्त होऊन अन्य विवाह करूं नये.

१९. नावड, अप्रेम, अथवा दुर्वर्तन, फार काय, व्यभिचार यावरून देखील विवाहित स्त्रीपुरुषांस काडी मोडून देऊन विवाहमुक्त होतां येत नाहीं.

२०. इष्टमित्रांनीं काडी मोडून देण्याविषयीं सल्ला

दिला, अथवा सरकारच्या अधिकाऱ्यांनीं तसें करण्याविषयीं परवानगी दिली, तरी ती केवळ व्यवहारदृष्टीनें ऐहिक सुखावर लक्ष्य ठेवून दिली असें समजावें. त्यांचें करणें ईश्वरेच्छेस बिलकुल संमत नाहीं.

२१. ईश्वरी नियमाप्रमाणें पाहातां विवाहबंधन अत्यंत पवित्र व सर्वथैव अभेद्य होय. ह्मणूनच आपणामध्यें विवाहबंधनास "रेशमाची गांठ" ह्मणण्याचा प्रघात आहे.

२२. प्रत्यक्ष परमेश्वरानें जो संबंध जोडिला आहे तो तोडण्याचा अधिकार कोणाही मनुष्यास नाहीं.

२३. इतकेंही असून जर कोणी केवळ काडी मोडण्यानें विवाहबंधनापासून मुक्त झालों असें समजून दुसरें लग्न करितील तर ते परमेश्वराचे घोर अपराधी होतील. त्याच्या समोर असला विवाह करणारे व तो लावणारे हे उभयतांही महा दोषी होत.

२४. विवाहानंतर पतिपत्नींमध्यें धर्मसंबंधी गोष्टींत मतवैपरीत्य उत्पन्न झालें तरी स्त्रीपुरुषांनीं विवाहबंधन तोडूं नये.

२५. दोघांपैकीं एके जणानें धर्मांतर करून परधर्मा-

चा स्वीकार केला तरी तेवढ्यावरून दुसऱ्यानें पुनर्लग्न करूं नये. तशा दुःखद अवस्थेंतही ईश्वरेच्छा प्रमाण मानून संतोषवृत्तीनें राहावें.

२६. उभयतांच्या भिन्न स्वभावामुळें अथवा दोघां-पैकीं एकाच्या दोषामुळें कलह होऊन क्रोधाच्या आवे-शांत उभयतां विभक्त झालीं तरी परस्परांच्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत त्यांचें ऐक्य करून सख्य करण्यावि-षयीं त्यांच्या इष्टमित्रांनीं एकसारखे प्रयत्न करीत असावें.

२७. यावरून स्त्रीपुरुषांनीं पक्कें लक्ष्यांत ठेवावें कीं, विवाह ह्मणजे जन्माच्या गांठी होत. ब्राह्मसमाजांत वि-वाहमुक्त होण्याचें नांवही नाहीं.

२८. भर तारुण्यावस्थेंत स्त्रीस वैधव्य अथवा पुरुषास विधुरदशा प्राप्त झाल्यास त्या स्त्रीनें अथ-वा पुरुषानें पुनर्लग्न करण्यास हरकत नाहीं. परंतु हाच दुःखाचा प्रसंग पोक्त वयांत प्राप्त झाला असतां एकटें राहून शेष उरलेलें आयुष्य सत्कर्मांत व ईश्वरभजनांत खर्च करावें.

२९. वधुवरांचीं कुळें जेवढ्या दूर संबंधाचीं असतील तेवढीं चांगलीं.

३०. विवाहसंबंध अगदीं जवळच्या नातेवाइकांबरोबर तर कधींच करूं नये. हा संबंध जवळच्या आप्तांबरोबर केल्यानें प्रजा दुर्बल व अनीतिमान निपजते.

३१. वधुवरांच्या आईबापांच्या निदान चार पिढ्यांपर्यंत त्यांचा परस्पर संबंध नसावा. वधुवरें जितक्या भिन्न कुलांतील असतील तितकीं विशेष चांगलीं जाणावीं.

३२. विवाहाविषयीं उभयतां वधुवरांचा निश्चय झाला ह्मणजे एकादे शुभ दिवशीं उभय कुटुंबांच्या इष्टमित्रांसमोर त्यांचीं अभिवचनें व्हावींत. हा प्रसंग वधूच्या गृहीं व्हावा. विवाहकालीं वधुवरांस काय काय देणग्या व अलंकारभूषणें द्यावयाचीं वगैरेविषयीं सर्व ठराव ह्याच प्रसंगीं करावे, व कारण असल्यास ते तेथल्या तेथेंच कागदपत्रीं लिहून ठेवावे. शेवटीं वधुवरांनीं विवाहसंमतीदाखल आपल्या प्रेममुद्रिका एकमेकांस द्याव्या. हा विधि झाला ह्मणजे वाङ्निश्चय होऊन विवाहसंबंध निश्चित झाला असें समजावें.

३३. एकाद्या विवाहसंबंधापासून भिन्न वर्णांचें ऐक्य होऊन परमेश्वराच्या पवित्र धर्माचा प्रसार होण्याचा संभव आहे, असें मुलामुलींच्या आईबापांस विवेक-

पूर्वक वाटत असल्यास त्यांनीं मुलगामुलगी धर्मनियमाप्रमाणें उपवर होण्याचे पूर्वी वाङ्निश्चयविधि करण्यास हरकत नाहीं. परंतु हा वाङ्निश्चय मुलें* सज्ञान अवस्थेंत आल्याशिवाय सहसा करूं नये, आणि त्यांचा विवाह व्हावयाचा तो तीं वयांत आल्याशिवाय कधींही होऊं नये.

३४. वाङ्निश्चयविधि विवाहाप्रमाणेंच पवित्र समजावा. तथापि, विवाहविधि झाल्याशिवाय भावी वधुवरांस पतिपत्नीसंबंधानें राहण्याचा अधिकार नाहीं. इतकेंच केवळ नव्हे. परंतु त्यांच्या आईबापांनीं त्या उभयतांमध्यें कोणत्याही प्रकारचा अतिपरिचय होऊं देऊं नये.

३५. लग्नाकरितां निश्चित केलेल्या दिवसाच्या एक अठवडाभर अगोदर भावी वधुवरांचा अभ्यंगस्नानविधि करावा. ह्या दिवशीं मुलाच्या घरीं मुलास व मुलीच्या घरीं मुलीस मोठ्या समारंभानें मंगल स्नान घालावें.

३६. मुलामुलीच्या आंगास सुवासिक तैलें लावून मंगल वाद्यांसह त्यांस उष्णोदकाचें स्नान घालावें. त्या वेळीं स्त्रियांनीं मंगल गाणीं ह्मणून त्यांस पाणी घालावें, आणि त्यांच्यावर पुष्पवृष्टि करावी. हा स्नानसमारंभ आटोपल्यानंतर सुंदर वस्त्राभरणें परिधान करून

वरानें आपल्या इष्टमित्रांसह वधूच्या घरीं भोजनास जावें.

३७. ह्या दिवसापासून दोन्ही कुटुंबांतील माणसांनीं एकमेकांच्या घरीं भोजनास जावें व परस्परांस भेटी पाठवाव्या. सारांश, जेणेंकरून उभय कुटुंबांत विशेष ऐक्य होईल अशा रीतीनें हे मध्यंतरीचे दिवस जावे.

३८. विवाहाचा दिवस आला ह्मणजे वधुवरांचीं गृहें झाडून सारवून व रंग लावून सुशोभित करावीं. विवाह मंदिरांत अथवा वधूच्या गृहीं व्हावा. विवाहाच्या दिवशीं विवाहस्थान फुलांच्या माळा, वृक्षपल्लवांचीं तोरणें, झाडांच्या कोंवळ्या फांद्या, वेली, व भव्य निशाणें इत्यादिकांनीं शोभायमान करावें. घरामध्यें प्रशस्त जागा नसल्यास घरासमोर लग्नमंडप घालून तो सुशोभित करावा.

३९. वराचे आप्त इष्टमित्र यांनीं वराच्या घरीं जमून वरास सुंदर वस्त्रांनीं भूषित करून द्रव्यसामर्थ्याप्रमाणें हत्ती किंवा घोडा यासारख्या वहनावरून अथवा पालखी, रथ, अथवा मेणा यांमधून मोठ्या समारंभानें वाजत गाजत वधूच्या घरीं न्यावें. या प्रसंगीं सर्वांच्या पुढें वाद्यें, त्यानंतर वराचें वहन, नंतर स्त्रिया, व त्यांच्या मागून पुरुष, आणि सर्वांच्या मागून गाड्या घोडीं अशा क्रमानें वराची स्वारी वधूच्या गृहीं जावी.

४०. दाराशीं वर येतांक्षणींच वधूचा बाप व इतर मंडळी यांनीं त्यास सामोरें जाऊन त्याचें योग्य आगत-स्वागत करावें आणि मंडपामध्यें ज्या ठिकाणीं शिष्ट मंडळी बसली असेल त्या ठिकाणीं प्रमुख स्थानीं त्यास नेऊन बसवावें.

४१. विवाहविधीची सर्व तयारी झाली असें पाहून वधूच्या बापानें जमलेल्या शिष्ट मंडळीस ह्मणावें.—"महाराज, माझी प्रिय कन्या, **कुमारी** * * * इचा, **श्री** * * * यांजशीं आज या शुभ दिनीं विवाह करण्याचें योजिलें आहे. त्यास आपली अनुज्ञा असावी." हें ऐकून शिष्ट मंडळींनें "स्वस्ति, स्वस्ति, स्वस्ति" असें त्रिवार ह्मणावें.

४२. वधुवरांस बसविण्याचें स्थान उपासकाच्या वेदीसमोर जमिनीपासून अमळ उंच असावें. त्यावर सुंदर सतरंजी, गालिचा घालून व सभोंवतीं फुलांच्या माळा लावून तें सुशोभित केलेलें असावें. शिष्ट मंडळीची अनुज्ञा मिळाल्यावर वरास वरील स्थानीं नेऊन बसवावें. त्याच्यासमोर त्याजकडे मुख करून मुलीच्या पित्यानें किंवा पालकानें बसावें. तदनंतर **वरण ह्मणजे वराचा सत्कार** हा संस्कार करावा.

## वरण म्हणजे वराचा सत्कार.



४३. मुलीच्या पित्यानें अथवा पालकानें एका लहान ताटांत सुवासिक फुलें, अत्तर, गुलाब, चंदन, इत्यादि सुगंधि द्रव्यें घालून तें ताट आपल्या उजव्या हातांत घ्यावें, आणि मोठ्या नम्रतेनें वरास म्हणावें.—

"महाराज, ह्या अर्घ्याचा आपण स्वीकार करावा."

वर—ह्या अर्घ्याचा मी स्वीकार करितों.

पिता—महाराज, ह्या विवाहवस्त्रांचा आपण स्वीकार करावा.

वर—ह्या विवाहवस्त्रांचा मी आभारपूर्वक स्वीकार करितों.

पिता—हें सुवर्णांगुलीयक आपण स्वीकारावें.

वर—मी याचा प्रेमपूर्वक स्वीकार करितों.

४४. इतकें झाल्यावर प्राप्त झालेलीं विवाहवस्त्रें बरोबर घेऊन वरानें एकाद्या खोलींत जावें व तेथें आपलीं पूर्वींचीं वस्त्रें काढून ठेऊन नूतन वस्त्रें परिधान करावीं.

४५. याप्रमाणें विवाहवस्त्रें परिधान करून वर बाहेर आला ह्मणजे उपाध्यायानें त्यास एकांतस्थलीं ईश्वरध्यान करण्यास बसवावें. कांहीं कालपर्यंत ईश्वरचिंतन झाल्यावर त्यास पुनः विवाहस्थानीं आणून बसवावें. वराची स्वारी स्थित झाल्यावर सुंदर वस्त्राभरणांनीं आलंकृत अशा वधूस बाहेर आणून वेदीसमोर विवाहस्थानीं वराच्या सन्मुख बसवावें. तदनंतर उपाध्यायानें वधुवरांची संमति घ्यावी.

## संमति.

४६. प्रथमतः उपाध्यानें वरास विचारावें.—

"**श्रीमन्** * * * **श्रीमती** * * * यांजशीं विवाह करण्याविषयीं आपली संमति आहे ना?"

वर—होय महाराज, माझी पूर्ण संमति आहे.

नंतर त्याचप्रमाणें उपाध्यानें वधूसही विचारावें.—

"**श्रीमती** * * * **श्रीमन्** * * * यांजशीं विवाह करण्याविषयीं आपली संमति आहे ना?"

वधु—होय महाराज, माझी पूर्ण संमति आहे.

# कन्यादान.

४७. तदनंतर मुलीच्या पित्यानें आपली कन्या वराच्या स्वाधीन करावी. कन्या स्वाधीन करितांना ह्मणावें.—

**पिता**—सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वांतर्यामी परमेश्वराच्या साक्षीनें आज शके * * वर्षाच्या, * * महिन्याच्या, * * तिथीस, * * रोजीं, माझी प्रिय कन्या **श्रीमती** * * ही, **श्रीमन्** * * जे * * यांचे प्रपौत्र, * * * यांचे पौत्र, आणि * * यांचे पुत्र, त्यांच्या स्वाधीन विवाहविधिपूर्वक करितों. आजपासून इचें सर्वस्वी रक्षण करण्याचा अधिकार यांचा आहे !

**वर**—सर्वसमर्थ, सर्वहृदयदर्शी परमात्म्याच्या साक्षीनें **श्रीमती** * * * जी * * * यांची प्रपौत्री व **श्रीयुक्त** * * * यांची प्रियतम कन्या होय, तिचा मी मोठ्या प्रेमानें अंगिकार करितों. सर्व प्रकारें तिचें रक्षण करण्यास परमेश्वर मला सामर्थ्य देओ !

**पिता**—धर्म, ज्ञान, अर्थ, आणि काम इत्यादि कोणत्याही गोष्टींच्या संबंधानें आपण इची उपेक्षा करूं

## कन्यादान.

४७. तदनंतर मुलीच्या पित्यानें आपली कन्या वराच्या स्वाधीन करावी. कन्या स्वाधीन करितांना ह्मणावें.—

**पिता**—सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वांतर्यामी परमेश्वराच्या साक्षीनें आज शके * * वर्षाच्या, * * महिन्याच्या, * * तिथीस, * * रोजीं, माझी प्रिय कन्या **श्रीमती** * * ही, **श्रीमन्** * * जे * * यांचे प्रपौत्र, * * * यांचे पौत्र, आणि * * यांचे पुत्र, त्यांच्या स्वाधीन विवाहविधिपूर्वक करितों. आजपासून इचें सर्वस्वी रक्षण करण्याचा अधिकार यांचा आहे !

**वर**—सर्वसमर्थ, सर्वहृदयदर्शी परमात्म्याच्या साक्षीनें **श्रीमती** * * * जी * * * यांची प्रपौत्री व **श्रीयुक्त** * * * यांची प्रियतम कन्या होय, तिचा मी मोठ्या प्रेमानें अंगिकार करितों. सर्व प्रकारें तिचें रक्षण करण्यास परमेश्वर मला सामर्थ्य देओ !

**पिता**—धर्म, ज्ञान, अर्थ, आणि काम इत्यादि कोणत्याही गोष्टींच्या संबंधानें आपण इची उपेक्षा करूं

नये. हिचें ऐहिक व पारमार्थिक कल्याण होईल अशा रीतीनें इजशीं आपण सर्वदां वागावें.

**वर**—अशाच प्रकारें मी इजशीं सर्वदां वागेन.

**पिता—श्रीमन्** * * * ही माझी प्रिय कन्या आज या सुमंगल समयीं विवाहविधिपूर्वक आपल्या स्वाधीन केली आहे. तिजबरोबर माझ्या सामर्थ्यानुरूप हे अलंकार आणि या संसारोपयोगी वस्तु आपणास देतों. यांचा आपण स्वीकार करावा.

**वर**—या सर्वांचा मी कृतज्ञतापूर्वक स्वीकार करितों. स्वस्ति.

## विवाहबंधन.

४८. तदनंतर "वधुवरांनीं परस्परांचा उजवा हात धरावा" असें उपाध्यायानें त्यांस सांगावें. त्याप्रमाणें आपल्या उजव्या हातानें वरानें वधूचा उजवा हात धरिल्यावर उपाध्यायानें शुभ्र पुष्पांची एक माला घेऊन ती वधुवरांच्या हातांसभोंवती गुंडाळावी. तिचीं दोन शेवटें

घेऊन त्यांची गांठ मारावी. ही सुमनमाला या वधुवरांचें प्रेमबंधन होय व तिची ग्रंथि ही त्यांची प्रेमग्रंथि होय. ह्या प्रेमबंधनाचा अर्थ व त्याचें महत्व उभयतांस स्पष्ट करून सांगितल्यावर खालीं दिलेलीं वचनें उपाध्यायानें मोठ्या गंभीर वाणीनें वधुवरांकडून वदवावीं.—

**वर—श्रीमती** * * आज या शुभ दिनीं परमेश्वरासमक्ष मी तुजशीं विवाह करितों. आजपासून तूं माझी धर्मपत्नि आहेस.

**वधु—श्रीमन्** * * आज या शुभ दिनीं परमेश्वरासमक्ष मी तुह्मांशीं विवाह करितें. आजपासून तुह्मी माझे धर्मपति आहां.

**वर**—संपत्तीमध्यें व विपत्तीमध्यें, सर्व प्रकारच्या सुखदुःखांत, हरएक प्रकारच्या रोगक्लेशांत मी तुला कदापि अंतर देणार नाहीं.

**वधु**—संपत्तीमध्यें व विपत्तीमध्यें, सर्व प्रकारच्या सुखदुःखांत, हरएक प्रकारच्या रोगक्लेशांत मी तुह्मांस कदापि अंतर देणार नाहीं.

**वर—**माझें अंतःकरण सर्व काळ तुझ्या ठायीं राहो; तुझें अंतःकरण सर्व काळ माझे ठायीं राहो; आणि आप-

णा उभयतांचीं अंतःकरणें परमेश्वराच्या ठायीं राहोत.

वधु—माझें अंतःकरण सर्वकाल तुमच्या ठायीं राहो; तुमचें अंतःकरण सर्वकाल माझे ठायीं राहो; आणि आपणा उभयतांचीं अंतःकरणें परमेश्वराच्या ठायीं राहोत.

वर—मी सर्वस्वी तुझा; तूं सर्वस्वी माझी. आपणा उभयतांच्या प्रेमांत कधींही विपर्यास न होओ.

वधु—मी सर्वस्वी तुमची; तुम्ही सर्वस्वी माझे. आपणा उभयतांच्या प्रेमांत कधींही विपर्यास न होओ.

## प्रार्थना.

वर—परमात्मन्, हें प्रेमबंधन तूं पवित्र कर. तें कदापि शिथिल होऊं देऊं नकोस!

वधु—परमात्मन, हें प्रेमबंधन तूं पवित्र कर. तें कदापि शिथिल होऊं देऊं नकोस!

[ इतकें झाल्यावर वधुवरांनीं खालीं बसावें. ]

## वधुवरांस उपदेश.

४९. नंतर उपाध्यायानें वधुवरांस बोध करावा.—

"हे नूतन विवाहित वधुवरांनों, दयामय परमात्म्याच्या कृपेनें त्याच्या समक्ष तुह्मीं उभयतां विवाहबंधनानें बद्ध झालां आहां ! आजपर्यंत तुह्मीं स्वतंत्र होतां. परंतु आतां तसें नाहीं. आजपासून तुह्मांपैकीं प्रत्येकास दोघांची चिंता आहे. तुह्मां उभयतांचीं शरिरें भिन्न आहेत, तरी तुमचें मन एक असलें पाहिजे. तुह्मां उभयतांमध्यें कोणत्याही प्रकारचा भिन्नभाव होतां कामा नये.

"विवाह हें संसारमंदिराचें द्वार होय. तें ओलांडून आज तुह्मीं संसारांत प्रवेश केला आहे. संसार हें परमात्म्याचें वसतिस्थान होय. ह्यामध्यें आपले सर्व आचारविचार पवित्र राखा. विचारी व अनुभवी पुरुषांनीं ह्या संसारास भयाण रानाची उपमा दिली आहे. ती यथायोग्य आहे. या रानाचा मार्ग फार बिकट आहे. तो आक्रमीत असतां फार सावध राहिलें पाहिजे. इहलोकच्या क्षणिक सुखसंपत्तीच्या मोहास वश होऊन सर्व सुखांचा दाता जो परमेश्वर त्यास विसरूं नका.

त्याच्या ठायीं भक्तिभाव वाढवून त्याची कृपा संपादन करा. परस्परांच्या ऐहिक सुखाप्रीत्यर्थ जसे रात्रंदिवस झटाल तसेच—किंबहुना त्याहूनही अधिक—पारलौकिक कल्याणाच्या कामींही सतत जागृत रहा. संसारसंबंधीं लहान मोठें कोणतेंही कार्य कर्त्तव्य झालें तरी तें परमेश्वराच्या नांवानें करा. त्याचें स्मरण केल्यावांचून कोणत्याही कार्यास हात घालूं नका.

ब्रह्मनिष्ठोगृहस्थस्यात् तत्त्वज्ञानपरायणः।
यत् यत् कर्म प्रकुर्वीत तत् ब्रह्मणि समर्पयेत ॥

ह्मणजे—संसारी गृहस्थानें सर्वदां ब्रह्मनिष्ठ राहून तत्त्वज्ञानाविषयीं फार आतुर असलें पाहिजे. जें कांहीं कर्म तो करितो तें त्यानें परमेश्वराच्या ठायीं समर्पण करावें. हें दिव्य वचन आपल्या हृत्पटावर लिहून ठेवा—त्याचा विसर पडूं देऊं नका. त्याजप्रमाणें वागण्यास भिऊं नका.

"तुमचें सर्वस्व परमेश्वरास अर्पण करा. ह्मणजे सर्व अरिष्टांपासून तो तुमचें संरक्षण करील. तुमचें गृह परमेश्वराचें पवित्र मंदिर होय, हा भाव अंतःकरणांत निरंतर जागृत ठेवा. जेणेंकरून ह्या पवित्र ब्राह्मधर्माचे गौरव होतील अशा रीतीनें सतत वागा."

९०. वरास बोध.—“**श्रीमन्** * * परमेश्वरानें ही कोमल अबला आज तुमच्या स्वाधीन केली आहे. ही तुमची धर्मपत्नि होय. हिचें तुह्मी सर्व प्रकारें रक्षण करा. तिला सर्वदां संतुष्ट ठेवा. तिच्या ऐहिक व पारलौकिक सुखास जपा. अंतःकरणांत दुष्ट वासनांचा प्रवेशही होऊं देऊं नका. संसारांत सर्व प्रसंगीं आपलें चित्त स्थिर राहूं द्या. त्याच्याठायीं चंचलता उत्पन्न होऊं देऊं नका. कितीही मोह प्राप्त झाला तरी कामक्रोधादि दुर्वृत्तींच्या पाशांत सांपडूं नका. ह्या आपल्या प्रिय भार्येस धर्मज्ञान देऊन सन्मार्ग दाखवा ह्मणजे ती तुमचें अनुगमन करील. संसाराचीं सर्व कृत्यें ऐक्यभावानें व एकमतानें करा. तुमची धर्मपत्नि हेंच तुमच्या ऐहिक सुखाचें मुख्य स्थान. अतएव तिजशीं सदैव प्रेमानें वागा, आणि तिला इहलोकीं व परलोकीं शाश्वत सुखाची अधिकारीण करा.”

९१. वधूस बोध.—“**श्रीमती** * * आज तुह्माला परमेश्वरानें पतीच्या स्वाधीन केलें आहे. स्त्रियांना इहलोकीं पतीहून दुसरें कोणीही अधिक प्रिय नाहीं. ह्मणून पतीची आज्ञा पालन करणें, त्यास नेहमीं संतुष्ट राखणें, आणि त्याजवर अकृत्रिम प्रेम करणें, हेंच इहलोकीं तुमचें

श्रेष्ठ कर्तव्य. तें केल्यानें तुमचें कल्याण होईल, हें लक्ष्यांत ठेवा. कठोर भाषणानें, अथवा उण्या उत्तरानें, पतीचें अंतःकरण दुखवूं नका. ज्या स्थितींत परमेश्वर ठेवील त्या स्थितींत परमसंतोष मानून पतीबरोबर आनंदानें संसार करा. सर्वदां पतीच्या हितास जपा. त्याच्या मर्जीबाहेर वागूं नका व त्याच्या प्राप्तीबाहेर खर्च करूं नका. आपलें मन, वाणी, आणि क्रिया सर्वकाल पवित्र राखा. निरंतर धर्माचरण करून पतीचें कल्याण करा."

९२. याप्रमाणें बोध केल्यावर उपाध्यायानें वधुवरांस आशिर्वाद द्यावा.—

"हे नूतन विवाहित वधुवरांनो, दयामय परमात्मा तुमच्या संसारांत तुह्मांस सुख व शांति यांचा सदैव अनुभव देओ! तुमचें गृह पवित्र करो! तुमचा संसार मंगल करो! तुमच्या द्वारें ह्या पवित्र ब्राह्मधर्माचा निरंतर गौरव होईल असा कल्याणकारक आशिर्वाद तुह्मां उभयतां पतिपत्नींस देओ!"

९३. हें आशिर्वचन संपल्याबरोबर उपाध्यायानें व त्याच्या बरोबर सर्व मंडळीनें "ब्रह्मकृपाहि केवलं" हें वचन ह्मणावें.

९४. नंतर प्रसंगास अनुरूप असें एकादें संगीत ह्मणून त्याच्या शेवटीं सर्वांनीं—"शांतिः शांतिः शांतिः" असें त्रिवार ह्मणावें.

९५. याप्रमाणें विवाहविधि समाप्त झाल्यावर सरकारी कायद्याप्रमाणें विवाह नोंदवून घ्यावा. विवाह नोंदवावयाचा तो विवाहित दंपत्याच्या मुलाबाळांस सर्व प्रकारचे हक्क मिळावेत व त्यांस कोणत्याही प्रकारची अडचण होऊं नये एवढ्याच करितां.



# अन्त्येष्टि अथवा प्रेतसंस्कार.

## १९.

मनुष्याचा अंतकाल समीप आला असतां त्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारची अनास्था अथवा अगांभीर्य असूं नये.

२. मरणसमयीं मनुष्याच्या वृत्ति अत्यंत गंभीर असाव्या. मृत्यु सन्निध आला असें वाटूं लागल्याबरोबर मनुष्यानें इहलोकची सर्व विवंचना सोडावी आणि परलोकच्या तयारीस लागावें.

३. विचारशक्ति कायम आहे, आणि मन जोंपर्यंत शुद्धीवर आहे, तोंपर्यंत मरणोन्मुख झालेल्या मनुष्यानें आपल्या मालमत्तेची व पैशाअडक्याची जी काय व्यवस्था करावयाची असेल ती करावी. नंतर आपलीं मुलेंबाळें, सखेसोयरे, इष्टमित्र, चाकरनौकर या सर्वांस

जवळ बोलावून त्यांचा निरोप घ्यावा. त्यांस हिताच्या अथवा बोधाच्या गोष्टी सांगाव्या, आणि सर्व निरवानिरव करावी.

४. सोयरेधायरे व इष्टमित्र यांनींही त्याचा आशिर्वाद घेऊन त्यास निरोप द्यावा.

५. ह्याप्रमाणें इहलोकच्या गोष्टींची निरवानिरव झाल्यावर परलोकच्या यात्रेच्या तयारीस लागावें. संसारसंबंधीं सर्व व्यवधानांतून चित्त काढून पारलौकिक विचारांकडे लावावें.

६. घरांतील वृद्ध, वडील, पोक्त व अनुभवी अशा माणसांनींही आपल्या आप्ताच्या अंतकालीं त्याचें समाधान करावें, त्याचें चित्त स्वस्थ राहील अशा रीतानें वागावें. कोणत्याही प्रकारें त्याच्या आत्म्याच्या शांतीचा भंग करूं नये.

७. त्याच्याजवळ वारंवार प्रार्थना करावी, भक्तिपर पद्यें गावीं, धर्मपर ग्रंथ वाचावे, आणि त्याचें चित्त परलोकाकडे लावावें. त्याशीं जें कांहीं संभाषण करावयाचें तेंही स्वर्गलोक, तेथील विशुद्ध आनंद, शाश्वत सुख, व अखंड समाधान यांविषयींच करावें.

८. इहलोकचा आपला सर्व संबंध सुटला, आपण परलोकच्या द्वारामध्यें उभें आहों, एका क्षणानें आपणास परमेश्वराच्या समोर उभें राहावें लागेल, हें मरणसमयीं मनुष्याच्या मनांत उत्तम रीतीनें बिंबलें पाहिजे.

९. इहलोक सोडून परलोकीं **विश्वजननीजवळ** आपण तिच्या प्रेममय कुटुंबांत जात आहों—त्या ठिकाणीं दुःख, शोक, संताप यांचें नांवही नाहीं, अशा प्रकारचा दृढ विश्वास झाल्याशिवाय आत्म्याच्या ठिकाणीं मरणसमयीं शांति आणि समाधान उत्पन्न होत नाहींत. इहलोकची क्षणिक वस्ती सोडून आपण आपल्या निरंतरच्या गृहीं जात आहों, हा भाव आत्म्याच्या ठायीं अंतकालासारख्या गंभीर प्रसंगीं पूर्णपणें दृढ झाला पाहिजे.

१०. अशा प्रसंगीं नातलगांनीं किंवा इष्टमित्रांनीं दुःख करून अथवा शोक करून त्याचें चित्त व्यग्र करूं नये. त्याचें मन खालीं संसाराकडे न लावितां वर स्वर्गाकडे लावावें.

११. मरणकाल समीप आला असतां या आत्मारूप पक्ष्यास देहरूप पिंजऱ्यांत कोंडून ठेवण्याचा को-

णांहीं प्रयत्न करूं नये. उलट, तो इहलोकच्या बंधनांतून मुक्त होऊन स्वर्गलोकीं स्वातंत्र्यसुख अनुभविण्यास सत्वर जाईल अशी योजना करावी.

१२. मनुष्य मरावयास टेंकलें असतां हरिनामाइतकें गोड त्यास दुसरें कांहींच लागत नाहीं. ह्मणून अशा प्रसंगीं जे कोणी जवळ असतील त्या सर्वांनीं हरिनामाचा एकसारखा घोष चालवावा. अंतकालीं हरिनाम श्रवण केल्यानें मनुष्याचें मन आनंदभरित होतें. त्यास मृत्यूची भीति वाटत नाहीं.

१३. अशा आनंदाच्या अवस्थेंत त्यानें एकवार इष्टमित्रांचें अवलोकन करावें आणि शांत अंतःकरणानें डोळे झांकून विश्वजननीच्या प्रेममय अंकावर मस्तक ठेवून अंतकालचें निद्रासुख अनुभवावें !

१४. अंतकालीं मनुष्यानें प्रार्थना करावी कीं —

"मंगलमय पित्या, माझा इहलोकचा प्रवास संपला! मला लवकर स्वगृहीं ने आणि सर्व काल तुजसन्निध स्थल दे. माझी सर्व आशा, सर्व भरंवसा तुजवर आहे. माझा पिता, माझी माता, सर्व कांहीं तूंच आहेस. माझा सर्व भरिभार तुजवर टाकितों ! मज दीनास अंतर देऊं नको!

माझा अंगिकार कर ! ! शांतिः शांतिः शांतिः ! ! !"

१५. मृताचें शरीर निचेष्ट झालें आणि यांतील प्राण खरोखर नाहींसा झाला असें वैद्यानें सांगितलें म्हणजे त्या प्रेतास स्वच्छ स्नान घालावें. नंतर त्याचें शरीर कोरड्या फडक्यानें निर्मल पुसून त्यास नवीन वस्त्रें नेसवावीं. त्याचे केश अथवा अवयव अस्ताव्यस्त पडूं देऊं नयेत. याप्रमाणें नवीन वस्त्रें नेसाविल्यावर त्यास दुसऱ्या बिछान्यावर निजवावें आणि गळ्यापासून खालीं त्याचें सर्वांग शुभ्र वस्त्रानें नीट झांकावें. मुख मात्र उघडें ठेवावें.

१६. प्रेतावर, प्रेताच्या बिछान्यावर, व त्याच्या आसपास गुलाबपाणी वगैरे सुगंधी द्रव्यें शिंपडावीं. गुलाब, जाईजुई, बकुल, मोगरा इत्यादि सुवासिक पुष्पें प्रेतावर टाकावीं व ज्या ठिकाणीं तें ठेविलें असेल तेथें चंदन, ऊद, उदबत्या इत्यादि द्रव्यें जाळावीं.

१७. यानंतर मृताच्या अगदीं जवळच्या नातलगांनीं व इष्टमित्रांनीं त्या प्रेतासभोंवतीं बसावें आणि प्रार्थना करावी—"हे दुःखसंतापहारक परमेश्वर, आज तूं आमच्या या अत्यंत प्रिय बंधूस इहलोकींच्या कष्टप्रद यात-

नांतून सोडवून आपल्या सन्निध घेऊन गेला आहेस. त्याच्या आत्म्याचें आज अनंत कल्याण झालें ! तथापि, आह्मीं दुर्बल मनुष्यें ! त्याच्या वियोगानें आह्मांस अनिवार दुःख होतें ! आमचें अंतःकरण परम विव्हल होतें ! तूंच आमचे दुःखाश्रू पूस, आणि आमच्या मनाचें शांतवन कर! तुझी मंगल इच्छा प्रमाण मानण्यास तूंच आह्मां दीनांस धैर्य दे. परमात्मन्, ह्या मृत मित्राच्या आत्म्यास सर्वकाल तुझ्या चरणाजवळ स्थान दे ! त्याचा उद्धार कर ! त्यास सद्गति दे ! ”

१८. सर्व आप्त व इष्टमित्र यांस ही दुःखाची वार्ता कळवून पाचारण करावें. सर्व मंडळी जमल्यावर सर्वांनीं एकवार मृत मनुष्याचें मुख अवलोकन करावें. याप्रमाणें सर्वांनीं मुखावलोकन केल्यावर उपाध्यायानें मृत मनुष्याच्या अगदीं जवळच्या आप्ताच्या हातानें प्रेतावर फुलांच्या माळा घालाव्या आणि नंतर प्रेताचें मुख त्याच्या आंगावरील वस्त्राच्या पदरानें झांकावें.

१९. नंतर सर्व मंडळीनें निश्चल स्तब्ध उभें राहावें व त्यांच्या मध्यभागीं उपाध्यायानें उभें राहून प्रार्थना करावी—

"परमात्मन्, तूं सकल जगताचा चालक आहेस. सर्व गोष्टींचीं सूत्रें तुझ्या हातीं आहेत. तुझी मंगल इच्छा आह्मांस प्रमाण आहे. तिला मान्य होऊन ह्या दुःखाच्या प्रसंगीं आह्मी तुजसमीप सादर होतों. आमचा प्रिय बंधु आज आह्मांस सोडून परलोकीं तुजसमीप गेला आहे. त्याच्या वियोगानें आह्मां सर्वांस अत्यंत दुःख होतें. त्याचे अतिनिकट आप्त व संबंधी हे तर परम शोकाकुल झाले आहेत. प्रभू, त्यांच्या दुःखित अंतःकरणाचें सांत्वन कर. ह्या शोकाच्या प्रसंगीं त्यांचें समाधान करून त्यांस धीर देणारा तुजवांचून अन्य कोणीही नाहीं! यास्तव, त्यांचें संरक्षण तूंच कर. ह्या कठिण प्रसंगीं तुझी सत्ता प्रमाण मानून राहाण्याचें सामर्थ्य दे. इहलोकचें सर्व वैभव नश्वर व क्षणभंगुर आहे; त्याच्या ठायीं आह्मांस लुब्ध होऊं देऊं नकोस. तूं जो शाश्वत, सत्य, अविनाशी त्या तुजकडे आमच्या सर्व इच्छा व वासना लागतील असें कर. आमचा बंधु आज या इहलोकच्या सर्व कष्टांतून व यातनांतून सुटला. त्याच्या आत्म्यास तुझ्या ठायीं चिरकाल शांति व आनंद प्राप्त होईल असें कर. अनंतकालपर्यंत त्यास तुझा सहवास घडूं दे! शांतिः शांतिः शांतिः!!"

२०. ही प्रार्थना झाल्यावर चौघे जणांनीं प्रेतास उच-

लून त्याजकरितां तयार केलेल्या तिरडीवर नेऊन निजवावें. त्याचें सर्वांग अच्छादित असावें. प्रेतयात्रा चालू झाल्यावर त्याच्या सर्व मित्रांनीं पाळीपाळीनें त्यास खांदा द्यावा. प्रेतामागून आप्त इष्टांनीं चालावें. याप्रमाणें प्रेतयात्रा स्मशानापर्यंत आल्यावर निर्मल स्थलीं ती तिरडी ठेवावी.

२१. प्रेताचें दहन करण्याकरितां जी शय्या करावयाची ती कोरड्या व लवकर पेटणाऱ्या अशा लांकडाची असावी. तिची लांबी प्रेताच्या लांबीहून निदान एक हातभर तरी अधिक असावी.

२२. शवशय्येवर प्रेत निजवितांना त्याच्या आंगावरील वस्त्रें काढूं नयेत. वस्त्रांसहित फार हळू व सावकाशपणें त्यास शय्येवर निजवावें. नंतर त्यावर चंदनाच्या लांकडाचा एक थर घालावा व त्यावर तें सर्व शव पुरतेपणीं झांकून जाई अशा रीतीनें पुनः साधीं लांकडें रचावीं.

२३. प्रेत अगदीं निर्जिव असतें. त्यास सुखदुःखाच्या भावना होण्याचा मुळींच संभव नसतो. तथापि प्रेतसंस्काराच्या वेळीं त्यास फार जपून वागवावें. त्याचे अवयव वांकडे तिकडे होऊं देऊं नयेत. त्यांस सहसा छिन्नभिन्न करूं नये.

२४. याप्रमाणें चिता तयार झाल्यावर तिजवर चंदनाच्या लांकडाचे लहान लहान तुकडे, धूप, राळ इत्यादि द्रव्यें पसरावीं.

२५. सर्व मंडळींनीं प्रेताच्या सभोंवतीं राहावें व नंतर उपाध्यायानें जवळच्या नातलगाच्या हातून चितेस अग्नि लावावा. तो लावितांना आप्तानें ह्मणावें.—

" परमेश्वराच्या नांवानें माझ्या प्रिय आप्ताच्या ह्या पवित्र शवास मी हा अग्नि लावितों ! ह्याच्या योगें हें मृन्मय शरीर दग्ध होऊन जाईल; परंतु यामध्यें वास्तव्य करणारा आत्मा स्वर्गलोकीं चिरकालपर्यंत वास करील. हे जीवनदात्या प्रभू, ह्याच्या आत्म्यास तूं सदैव सुखी ठेव. ह्या पवित्र अग्नीच्या योगें जसें हें शरीर जळून भस्म होऊन जाईल, तसेंच तूं आपल्या कृपारूप अग्नीनें याचीं सर्व पातकें भस्म करून टाक ! ह्याच्या आत्म्यास सद्गति दे ! "

२६. ह्याप्रमाणें प्रेतास चिताग्नि दिल्यावर त्याचें पूर्ण दहन होईपर्यंत मंडळींनें प्रार्थना व भजन करीत बसावें. प्रेताचें पूर्ण दहन झाल्यावर सर्वांनीं स्मशानांतून निघावें.

२७. तेथून जाण्याचे अगोदर त्याच दिवशीं अथवा दुसरे दिवशीं प्रेताची रक्षा गोळा करून ती एकाद्या लहानशा पात्रांत भरावी व हें पात्र प्रथमश्राद्धतिथी-पर्यंत आपल्या घरीं ठेवावें.

२८. श्राद्धाच्या दिवशीं ही रक्षा पात्रासहित कोठें तरी सुरक्षित ठिकाणीं पुरावी.



# श्राद्धसंस्कार.

## २०.

मृताविषयीं दुःख करावयाचें तें स्वाभाविक असावें—मनोवृत्तींचें प्रदर्शन नसावें.

२. स्वाभाविक दुःख दाबूं नये. तसेंच, कृत्रिम दुःख आंगीं आणून त्याचें मिथ्या प्रदर्शनही करूं नये.

३. स्वाभाविक मनोभावना दाबण्याचा प्रयत्न कोणींही करूं नये. मनांतील दुःखोद्गार जसेच्या तसेच प्रदर्शित केल्यानें मनास मोठें समाधान होतें.

४. आपला अतिनिकट संबंधी अथवा अत्यंत प्रिय आप्त मृत झाला असतां नित्याप्रमाणें निश्चिंत मनानें मौजमजा व सुखोपभोग कोणाच्यानें करवतील? अशा दुःखाच्या प्रसंगीं ज्याच्या नेत्रास अश्रु येणार नाहींत असा पाषाणहृदयी मनुष्य कोण आहे?

५. सद्भक्तांचीं हृदयें अत्यंत कोमल असतात. त्यांच्यानें हा मिथ्या मनोनिग्रह होत नाहीं.

६. मृताविषयींचें दुःख फार सौम्य व मर्यादित असावें.

७. अतिशय दुःख केल्यानें डोकें हलकें पडतें; चित्तास भ्रम होतो; शरिरास व्याधि जडते; मनास सर्व कांहीं उदास भासूं लागतें; विश्वास, भक्ति, प्रेम हीं सर्व नाहींशीं होतात, मनुष्य द्वेषमय बनून जातो; व शेवटीं ईश्वरावरील विश्वास नाहींसा होऊन मनुष्य नास्तिक होतो.

८. सद्भक्तांचें दुःख खरें व मनापासून असलें पाहिजे, अविश्वासू लोक जसे शिव्या शाप देऊन आक्रोश करितात व किंकाळ्या फोडितात, त्याप्रमाणें विश्वासू मनुष्यांनीं करूं नये. त्यांनीं आपला सर्व भरिभार परमेश्वरावर टाकावा, आणि तो जें कांहीं करितो तें आपल्या हितासाठींच करितो असें पक्कें समजावें. दुःखाच्या योगें विनय, विश्वास, आस्तिक बुद्धि, व परमार्थतत्परता इत्यादि आत्मिक वृत्ति दृढ होऊन अंतःकरणांत खरें वैराग्य उत्पन्न झालें पाहिजे.

९. आयुष्याची चंचल गती व ऐहिक विषयांची नश्वरता यांचें मनुष्यास वारंवार स्मरण व्हावें व ऐहिक धन-

मानादिकांस त्यानें लुब्ध होऊन न राहातां पारमार्थिक सुखावर सर्वदां लक्ष्य ठेवावें, एवढ्याकरितांच परमेश्वरानें मनुष्यास मरण लावून दिलें आहे. मृत्युजन्य दुःख ही वरील सद्गुण शिकण्याची उत्कृष्ट शाळा होय. यास्तव, आप्तइष्टांच्या मरणानें उत्पन्न होणाऱ्या दुःखाच्या योगें ज्यांच्या मनांत या गोष्टी बाणत नाहींत त्यांस या दुःखाचा वास्तविक हेतु समजला नाहीं यांत संशय नाहीं.

१०. आप्तइष्टांवर ज्याचें जसें दृढ प्रेम असेल त्या मानानें त्याच्या मरणानें कमी जास्त कालपर्यंत दुःख होईल. परंतु मृत मनुष्याच्या स्मरणार्थ सूतक ह्मणून जें धरावयाचें तें सात दिवसपर्यंत धरावें. मृताच्या सर्व आप्तांनीं व विशेष जवळच्या इष्टमित्रांनीं हें सूतक धरावें.

११. या दिवसांत आपल्या देशाचाराप्रमाणें दुःखसूचक जीं कांहीं चिन्हें असतील तीं स्वीकारावीं. परंतु त्यांत शरिरास अपायकारक अथवा क्लेशदायक असें कांहीं नसावें.

१२. आपल्या या आर्यावर्तांत भगवा रंग वैराग्यसूचक मानिला आहे. ह्मणून या सात दिवसांत दुःखी मनुष्यानें भगव्या वस्त्राचा एक लहानसा तुकडा दुःखद-

शोक चिन्हादाखल उजव्या दंडावर अथवा छातीच्या डाव्या बाजूवर धारण करावा.

१३. सुतकाच्या दिवसांत अन्न अगदीं साधें असावें व वस्त्रेंही साधींच परिधान करावीं. घरांत कोणत्याही तऱ्हेचें पक्वान्न होऊं देऊं नये. तसेंच आनंदाचे दुसरेही सर्व प्रकार बंद ठेवावेत.

१४. या घरचीं माणसें सुतकांत आहेत असें बाहेरून येणाऱ्या मनुष्यास सहज समजावें ह्मणून घरामध्यें ओसरीवर एकाद्या ठळक ठिकाणीं एक दोन हात रुंदीचा भगव्या रंगाचा कपडा आढ्यापासून जमिनीपर्यंत टांगून ठेवावा.

१५. सुतकाचे सात दिवस संपल्यावर आठवे दिवशीं सकाळीं सुतक धरणाऱ्या सर्व मनुष्यांनीं सुस्नात व्हावें आणि मृत मनुष्याची रक्षा ज्या कुंभांत ठेविली असेल तो रक्षाकुंभ बरोबर घेऊन ज्या ठिकाणीं तो पुरावयाचा असेल त्या ठिकाणीं सर्वांनीं मिळून जावें. यास श्राद्धयात्रा ह्मणतात.

१६. मृत मनुष्याचा अगदीं जवळचा आप्त असेल त्यासच श्राद्ध करण्याचा अधिकार असावा. असा जो

श्राद्धकर्ता असेल त्यानें वरील प्रेतयात्रेच्या प्रसंगीं आपल्या हातांत रक्षाकुंभ घेऊन मंडळीच्या पुढें चालावें. इतरांनीं त्याच्या मागून चालावें. ओसरीवर टांगिलेला भगवा कपडा उंच काठीस बांधून कोणीं तरी मित्रानें तो निषाणाप्रमाणें उंच धरून श्राद्धकारावरोबर चालावें. सर्वांनीं सावकाश चालावें व चालतांना एकादें शोकगीत गावें.

१७. नियमित स्थलीं श्राद्धयात्रा आल्यावर सर्वांनीं उभें राहावें. सर्व जण उभे राहिल्यावर उपाध्यायानें प्रार्थना करावी—“परमात्मन् परमेश्वर, आमच्या मृत बंधूच्या जड देहाची ही पवित्र रक्षा पृथ्वीच्या उदरांत पुरून ठेवितों. याचा चेतनस्वरूपी आत्मा स्वर्गलोकीं तुजसन्निध आहे! याचा मृन्मय जड देह भस्म होऊन ही रक्षा अवशेष राहिली आहे! आमच्या स्मरणार्थ ती आह्मी या स्थलीं पुरितों! हें स्मारक पवित्र कर! आमच्या प्राणप्रिय बंधूच्या आत्म्यास स्वर्गलोकीं चिरकाल सुख व शांति दे! त्याच्या आप्तांचें व मित्रांचें सर्व प्रकारें समाधान कर. त्यांच्या संतप्त अंतःकरणास शांति आराम प्रदान कर.”

१८. ही प्रार्थना झाल्यावर तो कुंभ त्यांतील रक्षे-

सहित जमिनींत खोल पुरून टाकावा. उपाध्यायानें आपल्या हातानें त्याजवर माती लोटावी. सर्व खाडा भरला ह्मणजे त्याच्या तोंडावर चार पांच विटा बसवून त्या चुन्यानें बांधून घ्याव्या.

१९. कांहीं दिवसांनीं त्या विटांवर स्मारकादाखल संगमरवरी अथवा दुसऱ्या मऊ दगडाची लहानशी शीला बसवून तिजवर मृताचें नांव, जन्मशक, व मरणशक इत्यादि कोरून काढावें.

२०. रक्षाकुंभ पुरिल्यानंतर सर्व मंडळीनीं एकत्र मिळून मृत मनुष्याचें घरीं परत यावें. तेथें उपाध्यायानें पुनः उपासना करावी, व धर्मग्रंथाचे कांहीं भाग वाचून त्यांचा अर्थ सांगावा.

२१. नंतर श्राद्धकर्त्यानें परमेश्वराची प्रार्थना करावी. श्राद्धकर्ता हा मृत मनुष्याचा बंधु, पिता, किंवा पति असेल त्याप्रमाणें श्राद्ध करणाराच्या मनोवृत्ती निरनिराळ्या असल्या कारणानें त्याची प्रार्थनाही निरनिराळ्या प्रकारची होईल, हें उघड आहे; तथापि, मृत झालेल्या मनुष्यास दोन चार पुत्र असल्यास त्यांपैकीं जो सगळ्यांत वडील असेल त्यानेंच श्राद्धकर्ता व्हावें.

२२. ह्याप्रमाणें ज्येष्ठ पुत्र पित्याचें श्राद्ध करण्यास बसला ह्मणजे त्याच्या सर्व कनिष्ठ बंधूंनीं त्याच्या जवळ येऊन बसावें. सर्वांत वडील बंधूनें अशी प्रार्थना करावी.—

"हे प्रेममय प्रभू, आह्मांस सकल वस्तूंचा दाता तूं आहेस. आप्त, बंधु, सखे, सोयरे इत्यादि सर्व कांहीं तुझ्याच कृपेनें आह्मांस प्राप्त होतात, आणि तुझ्याच इच्छेनुरूप ते आह्मांस इहलोकीं सोडून परलोकीं गमन करितात. तुझी इच्छा शिव, तुझा हेतु मंगल! आमचा जन्मदाता पिता, आमचा प्राणप्रिय जनक, थोड्या दिवसांपूर्वीं आह्मांस सोडून तुजजवळ गेला. त्याच्या मरणदुःखानें आमचीं अंतःकरणें परम विव्हल होताहेत. परंतु इहलोकचीं अनिवार दुःखें, संकटें, व मोह यांपासून मुक्त होऊन सांप्रत तो तुझ्या समागमसुखाचा अनुभव घेत आहे, अशी जी आह्मांस दृढ आशा आहे तिच्या योगें आमचें समाधान होतें. हे प्रभू, त्याच्या आत्म्यास सर्व कालपर्यंत तुझ्या चरणीं आश्रय दे. आनंदभरित मुद्रेनें त्याजकडे अवलोकन कर; आणि त्यास तुझें प्रेमामृत अखंड कालपर्यंत पाज.

"हे भक्तवत्सल, आमच्या पित्याच्या मरणानें आह्मा

दीन बालकांचा आश्रय नाहींसा झाला आहे व आह्मीं उघडे पडलों आहों. आतां आह्मां निराश्रितांस तुजवाचून दुसऱ्या कोणाचाही आसरा राहिला नाहीं. तूंच आमचें सर्व प्रकारें संगोपन कर. दुःखितांस सुख देणारा, संतप्तांस शांति देणारा तुजशिवाय अन्य कोणीही नाहीं. अतएव आह्मी तुलाच शरण येतों; आमचा स्वीकार कर. आह्मांस आपलें ह्मण. इहलोकचें अशाश्वत सुख आणि मिथ्या प्रतिष्ठा यांच्या प्रबल मोहापासून आह्मांस सर्व प्रसंगीं राख. नुक्ताच गत झालेला आमचा पिता व इतर दुसरे आप्त हे सर्व जण स्वर्गलोकीं तुझ्या समागमसुखाचा अनुभव घेत आहेत, असा जो आमचा पूर्ण विश्वास आहे तो विशेष दृढ कर. ऐहिक विषयांच्या आशापाशांत आह्मांस बद्ध होऊं देऊं नकोस. आमच्या मृत्यूनंतर आह्मांस तुझ्या प्रेममयकुटुंबांत स्थल मिळेल असें कर. मायबाप, आमचें जीवन पवित्र कर. आमच्या सर्व आशा मनिषा मंगल कर, आणि आह्मांस तुझे खरे सेवक बनीव."

२३. नंतर उपाध्यायानें प्रार्थना करावी व आशीर्वाद मागावा.—

"हे जीवंत, जागृत परमेश्वर, आह्मी मनुष्यप्राणी

किती दुर्बल, किती क्षणभंगुर आहों ! या क्षणीं आह्मी आहों, आणि या क्षणीं नाहीं अशी आमची क्षणिक अवस्था आहे ! आह्मांस मृत्यु केव्हां आपलेंसें करील याचा नियम नाहीं. आप्तजन इष्टमित्र यांच्यासह या क्षणीं संसारसुखाचा अनुभव घेत आहों ! परंतु दुसऱ्या क्षणीं आमची कशी काय अवस्था होईल याचा बिलकुल भरंवसा नाहीं ! कदाचित या सर्वांस जागचेजागीं ठेवून आह्मांस एकदम तुजसमोर यावें लागेल ! ऐहिक ऐश्वर्य त्या वेळीं आमच्या उपयोगीं पडणार नाहीं; यास्तव हे **अनंत परमात्मन्**, सत्य शाश्वत सुखाकडे आमची दृष्टि लाव. परलोकाविषयींचा आमचा विश्वास दृढ कर. ज्या मृत बंधूच्या स्मरणार्थ आज आह्मी जमलों आहों त्याच्या आत्म्यास शांति दे. त्याचें मर्त्य, मृन्मय शरीर आमच्या दृष्टीआड झालें आहे, तरी त्याचा शाश्वत भाग जो त्याचा आत्मा त्याजविषयीं आमचें प्रेम यत्किंचितही कमी होऊं देऊं नकोस. तो अमर आहे. त्याचा व आमचा वियोग होऊं देऊं नकोस. सर्व पृथ्वीवर तुझें ब्रह्मराज्य होईल असें कर ! तुझी इच्छा असेल तोंपर्यंत आह्मांस इहलोकीं ठेव. ज्या दिवशीं तुला योग्य वाटेल त्या दिवशीं तुजजवळ बोलीव. मात्र तुझ्या चरणीं थारा दे. हे

भक्तवत्सल करुणासागर परमेश्वर, आह्मां दीनांस अंतर देऊं नकोस.

"दयामय पिता हें गृहमंदिर पवित्र करो! ह्या कुटुंबांत तो अखंड वास करो, आणि ह्यांतील सर्व मनुष्यांचें संरक्षण करो! **ब्रह्मकृपाहि केवलं.**"

२४. नंतर श्राद्धकर्त्यानें परमेश्वराचा आशिर्वाद मागावा.—

"माझा पिता, प्रपिता, प्रपितामह, आणि माझे सर्व पूर्वज स्वर्गलोकीं अनंत कालपर्यंत शाश्वत सुखाचा उपभोग घेवोत! ह्या पवित्र आर्यावर्तांतील ऋषी आणि मुनी धन्य असोत! ह्या देशांतील व परकी देशांतील संत व धर्मसंस्थापक धन्य असोत! त्यांच्या नामाचा जयजयकार होओ. ज्ञात आणि अज्ञात, मित्र आणि शत्रु, चांगलीं आणि वाईट, अशीं जीं कांहीं माणसें आजपर्यंत मृत झालीं आहेत त्या सर्वांचे आत्मे स्वर्गामध्यें सुखसंभोग करात! **ब्रह्मकृपाहि केवलं.** शांतिः शांतिः शांतिः"

२५. नंतर श्राद्धकर्त्यानें आपल्या शक्त्यनुसार जो कांहीं दानधर्म करावयाचा असेल तो करावा. तसेंच देशकल्याणाच्या व परोपकाराच्या मंडळ्यांस ज्या कांहीं देणग्या द्यावयाच्या असतील त्या द्याव्या.

# व्रतें आणि नियम.

## २१.

एथपर्यंत जे कांहीं आचार व संस्कार सांगितले ते सर्व प्रत्येक ब्राह्म गृहस्थास लागू आहेत. परंतु यांशिवाय दुसरेही कित्येक आचार आहेत. ते सर्वांस लागू नाहींत. ज्या कोणास कांहीं विशेष धर्मसिद्धि करावयाची असेल, किंवा कांहीं विशेष मनोवृत्तींवर जय मिळवावयाचा असेल, त्यांनीं मात्र ह्यांचें आचरण करावें. अशा आचारांपैकीं मुख्य ह्मटला ह्मणजे व्रतांचा होय.

२. ह्या विशेष व्रतांचें आचरण करण्यामध्यें अथवा नियम पाळण्यामध्यें कांहीं एक प्रकारचें पुण्य आहे, असें जर कोणास वाटत असेल तर ती चूक आहे. व्रतांच्या योगें पुण्यप्राप्ति होत नाहीं. परंतु तीं धर्माचरणाच्या कामीं साधनादाखल उपयोगीं पडतात.

३. व्रत करावयाचें तें अभिमानानें अथवा मोठेपणाच्या इच्छेनें सहसा करूं नये. त्यापासून मनोवृत्तींवर जो कांहीं बरा वाईट परिणाम व्हावयाचा त्या परिणामाप्रीत्यर्थ मात्र करावें.

४. तसेंच, जें व्रत एकास श्रेयस्कर झालें तेंच दुसऱ्यासही तसेंच होईल असाही नियम नाहीं. एका ऋतूंत जें व्रत हितकर होतें तें सर्व ऋतूंत हितकर होईल असेंही कोणीं समजूं नये.

५. व्रतें हीं औषधासारखीं होत. एकच औषध जसें सर्व मनुष्यांस अथवा एकाच मनुष्यास आयुष्याच्या सर्व अवस्थेंत लागूं पडत नाहीं, तसें व्रतही सर्वांस एकसारखें अथवा एकाच व्यक्तीस सर्व प्रसंगीं लागूं होत नाहीं. औषधांप्रमाणें व्रतेंही मनुष्याचा स्वभाव, प्रकृति, काल, स्थल इत्यादिकांच्या अनुसंधानानें बदलावीं लागतात.

६. वास्तविक कारण असल्याशिवाय कोणींही व्रत पतकरूं नये.

७. मनुष्याच्या आत्म्यास पुष्कळ गोष्टींची जरूरी

असते. त्या त्या गोष्टी प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य यावें एतदर्थ भक्तानें व्रताचरण करावें.

८. व्रतांचे प्रकार अनेक आहेत. पातिव्रत्य, पत्निव्रत, शिष्यत्व, भूतदया, आत्मपरीक्षण, शांति, क्षमा, आत्मसंयमन, भक्ति, योग, वैराग्य इत्यादि अनेक प्रकारचीं व्रतें आहेत.

९. संसारामध्यें आपले जे निरनिराळे संबंध असतात त्यांच्या संबंधीं कित्येक व्रतें असतात. तीं ह्मटलीं ह्मणजे सात्विक विवाह, पितृभक्ति, मातृसेवा, बंधुप्रेम हीं होत.

१०. स्त्रिया आणि पुरुष, लहान आणि थोर, विवाहित व अविवाहित, श्रीमान आणि दरिद्री, गृहस्थ आणि भिक्षुक, धनी आणि सेवक, राजा आणि प्रजा, अशा निरनिराळ्या स्थितींतील माणसांस निरनिराळीं व्रतें असतात. एक व्रत एकास फलदायक झालें ह्मणून तें दुसऱ्यासही तसेंच होईल असा नियम नाहीं.

११. संसारसंबंधीं, समाजसंबंधीं, स्वदेशसंबंधीं, बुद्धिविषयक, नीतिविषयक, परोपकारविषयक, आत्मिक, राजकीय, अशींही कित्येक व्रतें असतात.

१२. कोणत्याही प्रकारचें व्रत असो, तें परमेश्वरा-

च्या सहाय्यावांचून सहसा सिद्धीस जावयाचें नाहीं.

१३. आत्मशुद्धीची इच्छा धारण करून तिजप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करणें एवढें मात्र मनुष्याकडे आहे. तो प्रयत्न आपल्या हातून तडीस जाणें हें सर्वस्वी ईश्वरकृपेवर अवलंबून आहे.

१४. मनामध्यें क्षणोक्षणीं प्रबल होणाऱ्या पापवासनांपुढें मनुष्याचें कांहीं एक चालत नाहीं—परमेश्वराच्या सहाय्यावांचून आपल्या स्वतहाच्या बळानें कोणत्याही दुर्विकाराचें दमन होत नाहीं, हें भाविक मनुष्यानें पूर्ण लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

१५. परमेश्वराची प्रार्थना हें प्रत्येक व्रताचें जीवन होय. प्रार्थनेवांचून व्रताची सिद्धि होत नाहीं.

१६. व्रतसंबंधीं बाह्य क्रिया व कर्में हीं सर्व शुष्क होत. त्यांमध्यें पुण्याचा लवलेशही नाहीं. अंतःकरणाचा शुद्ध भाव व प्रेमळ भक्ति, परमेश्वराची विश्वासपूर्वक प्रार्थना यांशिवाय पुण्यप्राप्तीचा अन्य मार्ग नाहीं.

१७. यास्तव, व्रत धारण करण्याच्या अगोदर अभिमानरहित होत्साते आपला सर्व भारभार परमेश्वरावर टाका. त्याजवर दृढ निष्ठा ठेवा, आणि त्याचें सहाय्य मागा. हें केल्याशिवाय नुस्तें व्रत धारण करणें निरर्थक होय.

# रिपुसंहार.

[ व्रत १. ]

## २२.

रिपुसंहार ह्मणजे कामक्रोधादि षड्रिपूंचें दमन. सर्व व्रतांमध्यें रिपुसंहार हें व्रत अत्यंत श्रेष्ठ होय.

२. सर्व दैवी संपत्तीमध्यें चित्तशुद्धि फार महत्त्वाची होय, आणि इंद्रियें स्वाधीन झाल्याशिवाय चित्तशुद्धि होत नाहीं. यास्तव, मनोनिग्रह अथवा इंद्रियदमन याची योग्यता फार मोठी समजली पाहिजे.

३. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, आणि मत्सर हे मनोविकार वारंवार प्रबल होतात. जो यांच्या स्वाधीन होतो त्याच्या आत्म्याची दुर्दशा होऊन जाते. ह्मणून या दुष्ट दुर्वृत्तींच्या दास्यत्वांतून मुक्त होणें हें प्रत्येक मनुष्याचें प्रथम कर्तव्य होय.

४. कोणी कोपिष्ट, कोणी मत्सरी, कोणी अभिमानी, कोणी लोभी, व कोणी कामुक असतात. याप्रमाणें प्रत्येकाच्या मनावर कोणत्याना कोणत्या तरी मनोवृत्तींचें प्राबल्य असतेंच असतें. अशा रीतीनें मनुष्य विषयासक्त झाला ह्मणजे त्याच्या हातून भक्ति घडत नाहीं, प्रार्थना होत नाहीं.

५. यासाठीं नित्याभ्यासाच्या योगें हे मनोविकाररूप शत्रू आपल्या स्वाधीन करून घेतले पाहिजेत. याप्रमाणें त्यांच्यावर जय मिळविणें यासच त्यांचा संहार करणें असें ह्मणतात.

६. हें रिपुसंहारव्रत पतकरण्याचे अगोदर पापाचरणापासून आत्म्याचा किती अनिवार्य नाश होतो, हें मनांत पूर्णपणें बिंबलें पाहिजे. तदनंतर चित्तास घोर अनुताप झाला पाहिजे. अनुतप्त अंतःकरणानें परमेश्वराची वारंवार प्रार्थना करावी. अखंड आत्मपरीक्षण करून सर्व प्रकारची मौजमजा यांपासून बरेच दिवसपर्यंत दूर राहावें.

७. याप्रमाणें अंतःकरणाची तयारी झाल्यावर व्रतेच्छु मनुष्यानें व्रत घेण्याकरितां दिवस निश्चित करावा.

८. त्या दिवशीं प्रातःकालीं व्रतेच्छूनें सुस्नात होऊन

शांत व एकांत स्थलीं जावें. तेथें अंतःकरणांतील सर्व घोर पातकें ईश्वरास निवेदन करून त्याची करुणा भाकावी.

९. अनुतापानें त्याचें अंतःकरण इतकें दग्ध होऊन गेलें पाहिजे कीं, त्याच्या योगें हृदयस्फोट होऊन नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागाव्या. चित्तवृत्ति अत्यंत नम्र होऊन मनास लज्जा वाटावी.

१०. यानंतर पुनः स्नान करावें व कुटुंबांतील नित्याची प्रातरोपासना करावी. ती संपल्यावर सर्वांच्या समोर अथवा एकांत स्थलीं व्रतेच्छूनें रिपुसंहारव्रत ग्रहण करावें.

११. व्रत ग्रहण करितांना त्यानें ह्मणावें.—"सकल पातकांचें निरसन करणारी अशी जी परमेश्वरकृपा ती या प्रसंगीं मला सहाय्य होओ! आपल्या पवित्र जीवनाच्या योगें ज्यांनीं इहलोकीं स्वर्गसुखाचा अनुभव घेतला व मृत्यूनंतर परलोकीं शाश्वत सुख प्राप्त करून घेतलें, असे जे पुण्यमय साधुसंत त्यांची पदधूली या प्रसंगीं माझें अंतःकरण पावन करो!"

१२. इतकें ह्मणून ज्या कांहीं विशेष मनोवृत्तीचा

संहार कर्तव्य असेल तिला शब्दांनीं ताडन करून तिची निर्भर्त्सना करावी.—

"हे दुष्टा क्रोधा, तूं माझ्या अंतःकरणांत गृह करून राहिला आहेस. तेथें तुझें वास्तव्य झाल्यानें माझें अंतःकरण भ्रष्ट होऊन नरकाप्रमाणें अमंगल झालें आहे! तूं माझ्या हाडामांसांत खिळून बसला आहेस. माझा प्रत्येक रक्तबिंदु तुझ्या मारक विषानें दूषित झाला आहे! माझ्या श्वासोश्वासास देखील तुझी दुर्गंधि येते! अरे अधमा, तूं माझी विचारदृष्टि घालविलीस, विवेकज्योति मालविलीस, आणि आत्म्याच्या ठायीं घनघोर अंधकार करून टाकिलास!! तूं माझ्या अंतःकरणाचा स्वामी होऊं पाहताहेस. तूं दुष्ट पिशाच्च राक्षस आहेस. तूं माझ्या प्रेममय परमेश्वराचा महान् शत्रु आहेस. तुझ्या योगें मला माझा परमेश्वर अंतरत चालला आहे. माझे सर्व आचार विचार भ्रष्ट झाले! सुइच्छा ह्मणून माझ्या अंतःकरणांत उत्पन्न होत नाहीं! तुजमुळें माझी प्रार्थना शाब्दिक होते; भक्तीमध्यें माझें चित्त लागत नाहीं; ईश्वराच्या आराधनेपासून मला समाधान होत नाहीं. मला ही भयंकर अवस्था तुजमुळें प्राप्त झाली आहे. हे दुष्ट दुराधमा कोपा, तूं माझ्या आत्म्याचा सर्वस्वी नाश

मांडिला आहेस! तूं महा चांडाल आहेस! या पुढें मी तुला माझ्या अंतःकरणांत स्थान देणार नाहीं. तूं सकल पातकांचें मूळ. अतएव तूं अमंगल, तूं भ्रष्ट, तूं नारकीय! परमेश्वराच्या कृपासामर्थ्यानें तुला मी माझ्या अंतःकरणांतून घालवून देईन. नीघ, माझ्या अंतःकरणांतून! या क्षणीं चालता हो!

"हा कालपर्यंत तूं माझा बहुत छल केलास; आणि मींही मूढानें तो सर्व सहन केला. परंतु ह्या सुसमयीं तुझा सर्वस्वी नाश करून तुझ्या दुस्सह दास्यांतून मुक्त होण्याविषयीं परमसमर्थ परमेश्वरानें मला स्फूर्ति केली आहे! त्याच्या प्रसादसामर्थ्यानें एका निमिषामध्यें तुझा संहार करून टाकितों. हे दुष्ट चांडाल क्रोधासुरा, अवलोकन कर, तुझ्या वक्षस्थलीं ह्या व्रतरूपी महा प्रतापी शस्त्राचा परम दारुण प्रहार करितों. ह्याच्या योगें तुझा पूर्ण संहार झाला असें समज! तुझा नाश झाला! आतां माझ्या आत्म्याचा सर्व अंधकार लयास जाईल. सद्भावाचा सूर्य उदयास येऊन त्याच्या मंगल प्रकाशांत परमेश्वराची प्रेममय मूर्ति मला पुनः दर्शन देईल! माझ्या आत्म्याच्या ठायीं नवजीवन उत्पन्न होऊन त्याच्या योगें मी धन्य होईन! सर्वसमर्थ, सर्वाश्रय प्रभू

या सुसमयीं मला सहाय्य होओ! माझें व्रत सफल करो! मज पातक्यास पावन करो!!"

१३. याप्रमाणें रिपुसंहार केला ह्मणजे त्या मनुष्यानें हें व्रत घेतलें असें समजावें. एव्हांपासून तो व्रतस्थ झाला. शेवटीं त्यानें ईश्वरप्रार्थना करावी.—

"हे दुरितनाशन पतितपावन परमेश्वर, तुझ्या कृपाप्रसादानें मीं हें व्रत धारण केलें आहें. तें अखंड राखण्यास मला तूंच सहाय्य हो. तुझ्या सामर्थ्यानें ह्या प्रसंगीं माझ्या शत्रूवर जसा मला जय मिळाला त्याचप्रमाणें सर्वकाल जय मिळेल असें कर. मी दुर्बल आहें, शक्तिहीन आहें. तूंच माझा सांभाळ कर. मला पुनः क्रोधवश होऊं देऊं नकोस. आज जसा तूं क्रोधाचा संहार केलास तसाच तूं त्यास पुनरपि माझ्या अंतःकरणांत जागृत होऊं देऊं नकोस. माझ्या आत्म्याच्या ठायीं सर्वकाल शांति वास करील अशी योजना कर. तेथें चिरकालपर्यंत तुझें ब्रह्मराज्य होईल असा अनुग्रह कर! ब्रंह्मकृपाहि केवलं."



# शिशुशिक्षण अथव चित्रसाधन.

[ व्रत २. ]

## २३.

लहान मुलांमुलींस चित्रलेखाच्या द्वारें धर्माचीं व नीतीचीं पुष्कळ तत्वें चांगल्या रीतीनें शिकवितां येतात.

२. चित्रांच्या योगें त्यांच्या मनास करमणूक होऊन त्यांची जिज्ञासा जागृत होते. त्यामुळें त्यांस शिकविलेल्या गोष्टी त्यांच्या मनावर उत्तम प्रकारें ठसतात.

३. यास्तव, मुलें दहा बारा वर्षांचीं झालीं ह्मणजे त्यांच्या आईबापांनीं त्यांच्याकडून **चित्रसाधन** व्रताचें आचरण करवावें, ह्मणजे चित्रद्वारें त्यांस कांहीं गोष्टी शिकवाव्या.

४. खालीं सांगितलेले लेख घरामध्यें सारवून तयार

केलेल्या जमिनीवर रांगोळीनें काढावे. ते सुबक व साधे असावेत. ज्या स्थलीं हे लेख काढावयाचे त्यास **साधन-स्थान** ह्मणतात.

५. हें काम मुलाच्या आईनें, वडील वाहिणीनें, अथवा दुसऱ्या कोणीं संबंधी स्त्रीनें दररोज तिसरे प्रहरीं करावें.

६. चार पांच मुलांस एकत्र करून शिकवावें. परंतु दुसरीं मुलें नसल्यास एकट्यासच शिकवावें.

७. व्रताच्या प्रथम दिवशीं प्रातःकालीं मुलांस स्नान घालून त्यांच्याकडून स्वच्छ वस्त्रें परिधान करवावीं. प्रत्येकाच्या गळ्यांत फुलाची माळ घालावी.

८. नंतर आईनें त्यांस उपासनास्थानीं न्यावें. तेथें सर्व उपासना त्यांनीं श्रवण करावी. तद्नंतर सर्व मुलांनीं भुईस मस्तक लावून हात जोडून परमेश्वरास नमस्कार करावा, आणि मग आईबरोबर साधनस्थानीं जावें.

९. साधनस्थानीं गेल्यावर व्रतसंस्कारास याप्रमाणें प्रारंभ करावा.

१०. सर्व मुलांनीं एकदम ह्मणावें.—

"आह्मां मुलांचा व मुलींचा रक्षणकर्ता परमेश्वर त्याच्या नामाचा जयजयकार असो! परमेश्वर आमचा

पिता व आमची माता, तिच्या मंगल नामाचा सर्वकाल जयजयकार असो!"

११. नंतर प्रत्येक मुलानें व मुलीनें ह्मणावें.—

"हें पवित्र **चित्रसाधनव्रत** मला कल्याणकारी होईल असा अनुग्रह परमेश्वर करो."

१२. नंतर आईनें साधनपटावर रांगोळीनें [ १ ] एक हा अंक काढावा. मुलानें तो अंक मोठ्यानें वाचून त्यावर फुलें वाहावींत. नंतर आईनें मुलाकडून ह्मणवावें.—
"एक देव, एक भाव, एक कुटुंब, एक शास्त्र, आणि एक मुक्ति."

१३. एकाच्या पुढें **नवविधानाचें निषाण** काढावें. त्यावरही मुलानें फुलें वाहावींत आणि आईबरोबर ह्मणावें.—"पवित्र नवविधानाचा सर्वकाल जयजयकार असो!"

१४. तिसऱ्या चित्रांत **आशिआ, यूरोप, आफ्रिका,** व **अमेरिका** या चार खंडाचे नकाशे दाखवावेत. त्या सर्वांवर मुलानें पूर्ववत फुलें वाहावीं आणि ह्मणावें.—
"सर्व पृथ्वीवर शांति आणि समाधान वास करो, चाऱ्ही खंडांतील लोकांत ऐक्य व प्रेम यांचें वर्धन होवो"!!

१५. याप्रमाणें पुढें सांगितलेलीं चित्रें आईनें एका मागून एक काढावींत आणि मुलानें त्यांपैकीं प्रत्येकावर फुलें वाहून प्रत्येकानंतर पुढें सांगितल्याप्रमाणें ह्मणावें.

१६. **पैशाची पिशवी.**—परमेश्वराचें शाश्वत सत्य सर्व ऐहिक संपत्तीहून अत्यंत मोलवान होय.

१७. **सूर्यचंद्र.**–माझी सत्कीर्ति सूर्यतेजाप्रमाणें तेजस्वी व माझें प्रेम चंद्रकिरणाप्रमाणें आल्हाददायक असो.

१८. **नदी.**—नदीच्या प्रवाहाप्रमाणें माझा जीवनप्रवाह लक्षावधि जीवांस सुख व आनंद देणारा होवो.

१९. **चंदनवृक्ष.**—मला दुःख देऊन माझा छल करणाऱ्या माझ्या शत्रूंस देखील मजपासून या चंदनवृक्षाप्रमाणें आराम व आशिर्वाद प्राप्त होवो.

२०. **पर्वत.**—माझा विश्वास पर्वताप्रमाणें दृढ व माझा भाव हिमाचलाप्रमाणें अचल राहो.

२१. व्रताचरण करणारें मूल कन्या असल्यास तिला हीं खालीं सांगितलेलीं चित्रें दाखवावीं.

२२. **मंगलसूत्र.**—ज्याप्रमाणें हें मंगलसूत्र माझ्या कंठास भूषण साजतें त्याप्रमाणें माझें पातिव्रत्य माझ्या सर्व जीवनास भूषणावह होवो.

२३. **कंकण.**—दान हें माझ्या हस्तास सर्वश्रेष्ठ रत्नकंकण होवो.

२४. **लुगडें.**—विनयरूप वस्त्र माझ्या सर्व दोषांवर पांघरूण घालो.

२५. इतकें झाल्यावर मुलानें परमेश्वरास साष्टांग प्रणिपात करावा आणि ह्मणावें.—माझें हें व्रत सफल होईल अशी कृपा परमेश्वर करो !

२६. याप्रमाणें आशिर्वचन मागितल्यावर चित्रलेख पुसून काढावेत व साधनपट स्वच्छ सारवून ठेवावा. हा क्रम एक आठवडाभर ह्मणजे सात दिवसपर्यंत चालूं ठेवावा.

२७. सातवे दिवशीं हें **चित्रसाधनव्रत** समाप्त होतें. त्या दिवशीं आईनें ईश्वरप्रार्थना करून व्रत-समाप्ति करावी व सर्वांनीं एकदम " शांतिः शांतिः शांतिः " असें त्रिवार ह्मणावें.

२८. व्रतसमाप्तीच्या दिवशीं मुलांच्या हातून त्यांच्या सोबत्यांस व खेळगड्यांस खाऊ द्यावा, गरीब-गुरिबांस दानधर्म करावा, गाईगुरांस दाणाचारा घालावा, तसेंच पक्ष्यांस धान्य चारावें.

# आत्मिक विवाहव्रत.

[ व्रत. ३ ]

## २४.

आपला विवाहसंबंध विशेष आत्मिक करावा अशा विषयीं कोणापतिपत्नींस ईश्वरी स्फूर्ति झाली असतां त्यांनीं मात्र त्या स्फूर्तीनुरूप हें **आत्मिकविवाहव्रत** आचरण करण्यास प्रवृत्त व्हावें. इतरांनीं होऊं नये.

२. तरुणपणीं स्त्रीपुरुषें विवाह करितात. परंतु पोक्त वयांत हा आत्मिक विवाह झाल्याशिवाय उभयतांचा संबंध पूर्ण होत नाहीं.

३. तरुणपणच्या संसारिक विवाहाच्या योगें स्त्रीपुरुषें इहलोकीं एकमेकांचे सोबती होतात; परंतु या विवाहाच्या योगे तीं स्वर्गलोकीं देखील परस्परांचीं सहचारीं होतात.

४. मुलेंबाळें व्हावींत व संसारसुख प्राप्त व्हावें ए-

वळ्या करितांच विवाह करावयाचा असें विषयी जनांस वाटतें. परंतु हें सर्वथैव मिथ्या होय.

५. विवाह हें मरणानंतर परमेश्वराच्या ब्रह्मराज्यांत शाश्वत स्थान प्राप्त करून घेण्याचें एक श्रेष्ठ साधन होय.

६. यास्तव, विवाहित स्त्रीपुरुषांनीं पोक्त वयांत हें **आत्मिक विवाहव्रत** आचरण करावें. त्याच्या योगें इहलोकचा प्रेमसंबंध दृढ होऊन स्वर्गलोकींही त्यांचा समागम चिरकाल राहील.

७. वयाच्या चाळीसपासून पन्नासाच्या दरम्यान हा श्रेष्ठ विवाहसंस्कार करावा.

८. स्त्रीपुरुषें या पोक्त वयांत येईपर्यंत त्यांच्या आयुष्याचा बराच कार्यभाग होऊन जातो, मुलेंबाळें होऊन संसारसुखाचा बराच उपभोग प्राप्त झाला असतो, जन्मास येऊन जें कांहीं करावयाचें असतें त्याचा पुष्कळ अंश हातून होऊन गेलेला असतो. सारांश, इहलोकच्या संबंधाचीं थोडींच कामें करावयाचीं राहिलेलीं असतात.

९. यास्तव, अशा वयांत सुज्ञ स्त्रीपुरुषांनीं आत्मिक विवाहापासून होणारें सुख, समाधान, व आनंद यांविषयीं विचार करावा.

१०. हें व्रत पतकरण्यापूर्वीं तीन दिवसांपासून मनाची वृत्ति दृढ व स्थिर करावी. हे तीन दिवस पतिपत्नींनीं एकांत स्थलीं एकत्र भक्ति, भजन, ईश्वरचिंतन, प्रार्थना, ध्यान, शास्त्रवाचन इत्यादि धर्मसाधन करीत असावें.

११. याप्रमाणें मनाची तयारी झाल्यावर चवथे दिवशीं प्रातःकालीं उभयतां नवराबायकोनीं स्नान करून भगवीं वस्त्रें परिधान करावीं आणि कुटुंबांतील उपासनास्थानीं नित्याची उपासना करावी.

१२. नित्योपासना संपल्यावर पतिपत्नींनीं एकमेकांसमोर निरनिराळ्या आसनांवर बसावें.

१३. पतीनें पत्नीस ह्मणावें.—हे पत्नि, आज या शुभ प्रसंगीं परमेश्वरासमक्ष आपला आत्मिक विवाह लावण्यास आपण उद्युक्त झालों आहों ! हा मंगल संबंध कल्याणदायक करण्यास आपला कुलोपाध्याय साक्षात् परमात्मा वरदहस्त उभारून आपणासमोर उभा आहे ! धन्य प्रभूची कृपा !

१४. पत्नि—धन्य प्रभूची कृपा.! त्याच्या मंगल नामाचा जयजयकार असो !

१५. पति—पत्नि, आजपर्यंत जगांतील सुखदुःखां-

चा पुष्कळ अनुभव घेतला, संसारांत एकमेकांच्या सहवासांत राहून परस्परांस पुष्कळ सुख दिलें, शक्त्यनुसार मनानें व हातानें अल्पस्वल्प ईश्वरसेवाही केली, प्रभूच्या कृपेनें आजपर्यंत इहलोकीं दिवस काढिले. यापुढेंही सांभाळ करण्यास तोच समर्थ आहे. त्याच्या इच्छेनुरूप एके दिवशीं आपणास इहलोक सोडून परलोकीं जावें लागेल. त्या ठिकाणीं आपला वियोग होऊं नये, आपल्या प्रेमांत विपर्यास होऊं नये व आपला संबंध चिरकालचा व्हावा, एतदर्थ हा आत्मिक विवाह करण्याची सुइच्छा परमेश्वरानें आपणास दिली आहे. तिच्या प्रमाणें वागल्यानें आपलें प्रेम शुद्ध होऊन दृढ होईल, आपणास निरंतर ईश्वरसहवास घडेल. अतएव, प्रिये, हें व्रत पतकरण्यास तुझ्या मनाची सिद्धता आहे काय ?

१६. **पत्नि**—पति, प्रभूची आज्ञा मला शिरसावंद्य आहे ! तिच्याहून कल्याणतर दुसरें कांहींच नाहीं. यास्तव ती पालन करणें माझें प्रथम कर्तव्य होय. मी अत्यंत दुर्बल आहें. हें घोर व्रत आचरण करण्याचें सामर्थ्य देण्यास प्रभु समर्थ आहे !

१७. पति—तो सर्वसमर्थ परमात्मा आपल्या दुर्बल आत्म्यांस हें कठिण व्रत आचरण करण्याचें सामर्थ्य देवो !

१८. पत्नि—तथास्तु !

१९. पति—या परम पवित्र व अत्यंत गंभीर व्रताचे सात दिवस आहेत. हे सात दिवसपर्यंत एकनिष्ठ मनानें परमेश्वराची सेवा घडली पाहिजे, आपले मनोभाव विशुद्ध व विलीन असले पाहिजेत, इहलोकचीं सर्व बंधनें मुक्त झालीं पाहिजेत. तरच हें व्रत सफल होईल—अन्यथा नाहीं !

२०. पत्नि—सर्व कांहीं करण्यास प्रभुकृपा समर्थ आहे !

२१. पति—प्रिये, तुझा उजवा हात पुढें कर, आणि माझ्या उजव्या हाताशीं लाव. पहा, आतां आपणा उभयतांच्या सव्य हस्तांसभोंवतीं ही फुलांची माळ गुंडाळून तिच्या दोन्ही शेवटांस गांठ मारितों. ही सुकुमार सुमनमाला आपल्या प्रेमाचें बंधन होय. ह्या प्रसंगीं हिच्या योगें आपले हस्त एकत्र झाले आहेत. तद्वत विशुद्ध प्रेमबंधनाच्या योगें आपल्या आत्म्याचें निरंतर ऐक्य राहो.

२२. **पत्नि**—तथास्तु !

२३. **पति**—ही सुमनग्रंथि आपल्या प्रेमबंधनाचें वास्तविक दर्शक असल्यास आपले आत्मे निरंतर एकत्र राहातील. त्यांचा कधींही वियोग होणार नाहीं. आपण जसे आज एकत्र आहों तसेच आपले आत्मे स्वर्गामध्यें अवियुक्तरीतीनें विशुद्ध समागमसुखाचा अनुभव घेतील!

२४. **पत्नि**—असा माझा पूर्ण भाव आहे—दृढ विश्वास आहे ! परमेश्वर तो कधींही विफल करणार नाहीं !

२५. **पति.**—आतां आपण परलोकच्या यात्रेस निघालों आहों. आपण यात्रेकरूं आहों. यास्तव, हीं काषाय वस्त्रें, हें आसन, हीं धर्मपुस्तकें यांचा स्वीकार कर. तसेंच हें **नवविधानाचें** पवित्र निषाण, याचाही स्वीकार कर ! हा आपल्या राजाधिराजाचा जरिपटका असें समज ! त्याचें सर्वकाल आपल्या प्राणापलीकडे संरक्षण कर.

२६. **पत्नि**—या सर्वांचा मी आदरपूर्वक स्वीकार करितें.

२७. **पति**— आपले आचारविचार सदैव मंगल

असावेत; काम, क्रोध, लोभ, अभिमान इत्यादि दुर्वृत्ती आपण जिंकाव्या; विषयपराङ्मुख होऊन संसारासक्तीचा परित्याग करावा; भाव, भक्ति, प्रेम, दया यांस अंतःकरणांत सांठवून त्यांचें वर्धन करावें; आणि परमात्म्याचें ध्यान, भजन, कीर्तन, पुराणवाचनश्रवण, साधुसमागम ह्यांच्या द्वारें परमेश्वराशीं योग संपादन करावा. यांशिवाय आपणास आतां अन्य कर्त्तव्य नाहीं. दयामय हरी आपला हा आत्मिकविवाहसंबंध मंगलमय करो !

२८. पत्नि— तथास्तु.

२९. नंतर पतीनें प्रार्थना करावी.—

"हे योगयोगेश्वर, आह्मां उभयतांचीं अंतःकरणें सात्विक योगाच्या बंधनानें बद्ध करून टाक. आमच्या आत्म्यांचा वियोग होऊं देऊं नकोस. माझा आत्मा माझ्या पत्नीच्या ठायीं रत होईल, आणि तिचा आत्मा माझ्या ठायीं रत होईल, आणि आह्मां उभयतांचे आत्मे तुझ्या ठायीं दृढ संलग्न होऊन चिरकालपर्यंत योगानंदाचा अनुभव घेतील असा अनुग्रह कर. आमच्या सकल इच्छा, सकल कामना पवित्र पुण्यमय कर. आमचीं सर्व दुरितें जाळून भस्म कर. सर्व संसारबंधनां-

पासून आह्मांस मुक्त कर. या इहलोकच्या पार्थिवसुखांतून आमचीं अंतःकरणें काढून शाश्वत स्वर्गसुखांमध्यें निमग्न कर. तुजसमीप तुझ्या पुण्यमय प्रकाशांत आह्मी अक्षय्य वास करूं असें कर. शांतिः शांतिः शांतिः ”

३०. हें व्रत घेतल्या दिवसापासून सात दिवसपर्यंत पतिपत्नींनीं एकांत स्थलीं ईश्वराचें भजनपूजन करावें. पवित्र ग्रंथवाचन व आत्मिक विषयसंबंधी गोष्टींविषयीं संभाषण यांमध्यें हे सात दिवस घालवावे. तसेंच गरीबगुरिबांस दानधर्म करावा, पक्ष्यांस दाणा, गाईह्मशींस चारावैरण, झाडांस पाणी घालावें. भोजनसमयीं साधु सज्जनांस पंक्तीस घेऊस भोजन करावें.



# ब्रह्मचर्य.

[ व्रत ४. ]

## २५.

ब्रह्मचर्यव्रत धारण करूं इच्छिणाऱ्या पुरुषानें या प्रमाणें प्रतिज्ञा करावी.—

"सर्व सत्ताधीश प्रभू, तुझ्या इच्छेनुरूप हें घोर ब्रह्मचर्यव्रत धारण करण्यास मी सिद्ध झालों आहें. विवाह करून गृहस्थाश्रम पतकरूं नये, संसार व संसाराचीं सर्व सुखदुःखें, त्याच्या विवंचना, व त्याचे मोह यांपासून अलिप्त राहून माझें सकल जीवन तुझ्या सेवेमध्यें खर्च करावें अशी मला जी स्फुर्ति होत आहे, ती तुझ्या इच्छेनुरूप होत आहे! प्रभू तुझी इच्छा मंगल, शिव, कल्याणकारक! ती पालन करणें हें माझें परमश्रेष्ठ

कर्तव्य. अतएव, सर्व प्रकारच्या विषयवासनांचा परित्याग करून मी तुझ्या कल्याणदायी इच्छेचें अवलंबन करण्यास सिद्ध झालों आहें. आज शके * * * वर्षाच्या, * * * महिन्याच्या, * * तिथीस, * * रोजीं तूं जो सर्वांतर्यामी परमात्मा त्या तुझ्या साक्षीनें मी या परम पवित्र **ब्रह्मचर्यव्रताचा** स्वीकार करितों. माझ्या या देहांत देह आहे तोंपर्यंत मी या पुण्यमय आश्रमांत राहीन, त्याचे सर्व नियम पाळीन, विवाहाची गोष्टही मनांत आणणार नाहीं. माझ्या सर्व विषयवासना, संसारभोगेच्छा, यांचा आज या पवित्र दिवशीं या ब्रह्मचर्यव्रताच्या प्रखर अग्नीमध्यें होम करून टाकितों; आणि हें माझें जीवन परोपकार, परपीडाहरण, बंधुसेवा, ईश्वरभक्ति इत्यादि सत्कार्यांत खर्च करण्याचा दृढ निश्चय करितों. तो सफल करणारा तूं परमसमर्थ परमेश्वर आहेस ! तूं मला सहाय्य हो, आणि सन्मार्गापासून मला भ्रष्ट होऊं देऊं नकोस ! माझ्या व्रताचें रक्षण कर ! स्त्रियांच्या मोहपाशांपासून मला राख. संसाराच्या मायेपासून मला मुक्त कर, आणि या आश्रमाचीं सर्व कार्यें करण्याचें सामर्थ्य दे. इतरांनीं खुशाल विवाह करावा, संसारसुखाचा उपभोग घ्यावा, परंतु मीं

तुझी मंगल इच्छा प्रमाण मानून या सर्व बंधनांपासून अलिप्त राहून अश्रांतपणें तुझ्या सेवेंत रत राहिलें पाहिजे. सर्वसमर्थ परमेश्वर, तुझ्या मधुमय नामाचा सर्वत्र जयजयकार होवो !



# वैधव्य.

[ व्रत ९. ]

## २६.

हे भक्तवत्सल करुणानिधान परमेश्वर, ही तुझी दीन दुर्बल दासी विनम्र भावानें तुला शरण आली आहे! मी सर्व प्रकारें निराश्रित झालें आहें! माझा प्रिय पति मला सोडून परलोकीं तुजसमीप गेला आहे. इहलोकीं तो मला पुनः भेटणार नाहीं. त्याच्या वियोगदुःखानें माझें अंतःकरण होरपळून गेलें आहे. तुजवांचून मला आतां कोणाचाही आश्रय राहिला नाहीं. निर्धनिकांचें धन तूं, बलहीनांचें बल तूं, दुःखग्रस्तांचें आरामस्थान तूं! अतएव, ह्या तुझ्या दीन दासीनें तुझ्या चरणापाशीं धांव घेतली आहे! आतां माझें सर्वस्व तूं! हे सर्वाश्रय परमेश्वर, मला दुबळीला पदरीं घे. माझा स्वीकार कर.

तुझ्याच इच्छेनें ही वैधव्यावस्था मला प्राप्त झाली आहे. माझें सर्व सौभाग्य नष्ट झालें आहे. अशा अवस्थेमध्यें तूंच माझें संरक्षण कर. माझा प्राणप्रिय भर्ता इहलोक सोडून गेला; तो स्वर्गलोकीं शाश्वत आनंदाचा उपभोग घेत आहे. तुझ्या कृपेनें त्यास दिव्यावस्था प्राप्त झाली आहे. तूर्त त्याचा मला शारिरिक वियोग झाला आहे; तथापि मनानें तो मला सर्व काल जवळच आहे. माझा आत्मा निरंतर त्याशीं संलग्न राहून त्याच्या समागमसुखाचा उपभोग घेईल. अल्पकालपर्यंत तो मला अंतरला, तरी मृत्यूनंतर आमचें पुनरपि ऐक्य होईल; तोंपर्यंत या वैधव्यव्रताचें अवलंबन करण्यास मला सामर्थ्य दे !

हे प्राणाराम, प्राणेश्वर, प्राणपति, प्राणवल्लभ, परमेश्वर, तुज समक्ष मी हें वैधव्यव्रत धारण करितें. माझा पति गत झाला आहे; तथापि मी द्वितीय विवाह करणार नाहीं. माझें पातिव्रत्य मी अन्य पुरुषास सहसा अर्पण करणार नाहीं. आयुष्याचे अवशिष्ट दिवस मी ह्या वैधव्यावस्थेमध्येंच कंठीन, शेष राहिलेलें आयुष्य एकनिष्ठ भावानें तुझ्या सेवेंत खर्च करीन. दयामय प्रभू, तुझ्या या दुर्बल दासीची ही इच्छा परिपूर्ण करणारा तूं आहेस. सर्व पापमार्गांपासून माझें रक्षण कर. माझा स्वभा-

व नम्र, सहनशील, शांत, विनययुक्त कर. अंतःकरणांत तुझ्या सेवेविषयीं उत्कट लालसा निर्माण होऊं दे. भजनपूजन, ध्यानमनन यांमध्यें माझा सर्व काल जाईल असें कर. परोपकाराच्या कामीं माझा देह चंदनाप्रमाणें झिजेल असा अनुग्रह कर. सिद्धिदात्या परमेश्वरा, हें जीवन मला आणि इतरांस कल्याणकारी होईल अशी कृपाकर, हेंच तुझ्या अज्ञानी कन्यकेचें तुजजवळ मागणें आहे ! तें मान्य कर !



# साधक.

[ व्रत ६ ]

## २७.

हे परमेश्वर, ह्या असार संसारांतून मीं आपलें चित्त काढून तुझ्या चरणीं लावावें अशाविषयीं तुझ्या कृपेनें माझ्या अंतरात्म्यास उत्कट स्फूर्ति झाली आहे ! तिला अनुसरून हा तुझा दीन दास **साधक-व्रताचें** अवलंबन करण्यास उद्युक्त झाला आहे. आज-पासून मी संसारासक्त न होतां आपलें सर्व जन्म साधुस-मागमांत खर्च करावें व त्यांच्या सहवासास राहून शम-दमादि दैवी संपत्ती प्राप्त करून घ्यावी, अशी तुझी योजना आहे. तीप्रमाणें वागण्यास मी सिद्ध आहें !

आज या शुभकालीं शके * * * वर्षाच्या, * * * महिन्याच्या, * * तिथीस, * * रोजीं मी या पवित्र

**साधकव्रताचा** स्वीकार करितों. मी आपलें सर्व जीवन या **नवविधान**धर्मबंधुगणाच्या सेवेस अर्पण करितों ! या साधकाश्रमाचीं जीं नानाविध कर्मे आहेत तीं सर्व यथायोग्य रीतीनें करण्याचें सामर्थ्य मला दे. तुझ्या कृपेवांचून माझे सुनिश्चिय सफल होणार नाहींत. अतएव तूं सहाय्यदाता हो !



# विरक्तगृहस्थाश्रम.

[व्रत ७.]

## २८.

परमात्मन्, तुझ्या मंगल इच्छेनें या **विरक्तगृहस्थाश्रमव्रताचें** आचरण करण्याची स्फूर्ति मला झाली आहे. परंतु हें व्रत परम घोर आणि अत्यंत दुस्साध्य आहे. संसारामध्यें स्त्रीपुत्र, मातापितरें यांच्या सहवासास राहून या सर्वांपासून विरक्त राहाणें परम कठिण आहे! संसाराचा मोह फार दारुण आहे. त्यांतून मुक्त होणें तुझ्या कृपेवांचून कोणासही शक्य नाहीं. यास्तव, हे प्रभू, ज्याप्रमाणें ही इच्छा तूं अंतःकरणांत उत्पन्न केलीस त्याचप्रमाणें ती सफल करण्याचें सामर्थ्यही तूंच दे. आज * * * वर्षांच्या,

* * * महिन्याच्या, * * तिथीस, * * रोजीं मी या **विरक्तगृहस्थाश्रमव्रताचा** स्वीकार करितों. सिद्धिदाता तूं सर्वसमर्थ परमेश्वर आहेस.

माझी सर्व प्राप्ति आजपासून तुझ्या या पवित्र **नवविधानधर्मास** अर्पण करीन. माझ्या व माझ्या कुटुंबाच्या पोषणास जें कांहीं अत्यावश्यक लागेल तेवढें मात्र समाजाधिकाऱ्यांच्या संमतीनें मी घेईन. बाकीचें सर्व तुझ्या पवित्र धर्माच्या रक्षणार्थ व प्रसारार्थ खर्च करीन.

माझें स्वतहाचें सुख व ऐषाराम ह्यांची बिलकुल पर्वा न करितां माझें सर्व तन, मन, व धन हीं तिन्हीं तुझ्या सेवेप्रीत्यर्थ खर्च करीन. मला फेडण्याचें सामर्थ्य नाहीं असें कर्ज मी कधींही काढणार नाहीं. तुझ्या प्रसादानें मला जी कांहीं ऐहिक संपत्ति प्राप्त होईल, तिचा संतुष्ट चित्तानें स्वीकार करून सकल ऐहिक वैभव अनुकूल असतांही मी अत्यंत नम्र, विनयसंपन्न, व संसारविरक्त असा राहीन ! या पवित्र व्रताचें आचरण करण्याचें सामर्थ्य मला परमेश्वर दान करो !



# धर्मप्रचारक.

[ व्रत ८. ]

## २९.

ज्या कोणास ब्राह्मधर्माचा प्रचारक व्हावयाचें असेल त्यानें इतर प्रोक्त व अनुभवशीर अशा ब्राह्मप्रचारकांच्या सहवासास राहून धर्माध्ययन करावें. धर्माध्ययन पूर्ण झाल्यावर त्यानें त्यांच्याजवळ एक वर्षपर्यंत राहून धर्म संपादन करून प्रचारकाच्या कामाचा उत्तम परिचय करून घ्यावा. हा शिक्षाकाल संपला, आणि हा गृहस्थ धर्मप्रचारकाची दीक्षा घेण्यास सर्व प्रकारें योग्य आहे, अशाविषयीं प्रचारकवर्गाची पूर्ण खात्री झाली ह्मणजे एकाद्या प्रमुख प्रचारकानें त्यास मुख्य आचार्यांकडे घेऊन जावें, आणि त्यांस सांगावें.—

२. "आचार्य, पवित्र ब्राह्मधर्माचे प्रचारक व्हावें अशी या आमच्या बंधूंची इच्छा आहे. यांच्या इच्छेनुरूप

मीं यांस आपणाकडे आणिलें आहें. प्रचारकाची दीक्षा घेण्यास हे समर्थ आहेत अशाविषयीं आपली व सर्व समाजबंधूंची खात्री झाल्यास यांस आपण दीक्षाप्रसाद द्यावा अशी विनंती आहे."

३. तदनंतर आचार्यांनीं दीक्षार्थी गृहस्थास विचारावें.

४. आचार्य.—प्रचारकदीक्षा घेण्यास आपण उद्युक्त झालां आहां ते कोणाच्या इच्छेवरून ?

५. दीक्षार्थी.—परमेश्वराच्या इच्छेवरून.

६. आ०—परमेश्वराची इच्छा तुह्मांस कशी समजली ?

७. दी०—माझ्या सर्व सात्विक मनोवासना रात्रंदिवस त्याच दिशेला धांवतात. माझी योग्यता, माझी मानसिक व आत्मिक आवड हीं सर्वं मी प्रचारकदीक्षा घ्यावी अशाविषयीं मला अंतर्साक्ष देतात. ह्यावरून मीं दीक्षा स्वीकारावी असाच ईश्वरी संकेत आहे असें मी मानितों.

८. आ०—मातेच्या उदरांत तुमचा संभव झाला तेव्हांपासून ईश्वराचा असाच संकेत होता व अशाच हेतूनें त्यानें तुह्मांस जन्मास घातलें आहे, आणि तो

ईश्वरी संकेत परिपूर्ण करण्याकरितांच या दीक्षेचा स्वीकार करण्यास तुझी उद्युक्त झालां आहां, असें तुझी मानितां काय ?

९. दी०—होय आचार्य, माझा असा पूर्ण विश्वास आहे.

१०. आ०—या पवित्र दीक्षेचीं जीं कांहीं कामें आहेत तीं सर्व यथायोग्य रीतीनें बजाविण्यास तुझी सिद्ध आहां काय? एकवार प्रचारक झाल्यावर त्यास हा आश्रम सोडितां येत नाहीं, हें तुझांस ठाऊक आहेना ?

११. दी०—होय, आचार्य.

१२. आ०—पवित्र ब्राह्मधर्म व ब्राह्ममंडल यांजशीं तुमचा कोणत्या प्रकारचा संबंध आहे ?

१३. दी०—ब्राह्ममंडलाचा मी एकनिष्ठ सेवक. शक्त्यनुसार सर्व ब्राह्मबांधवांची सेवा करावी व ब्राह्मधर्माचा निरंतर प्रसार करीत असावें, हा माझा अधिकार!

१४. आ०—तुमचें [ व तुमच्या कुटुंबाचें ] पोषण तुझीं कसें कराल ?

१५. दी०—माझें स्वतहाचें जीवन [ आणि माझें कुटुंब हें ] मीं परमेश्वरास अर्पण केलें आहें. माझ्या

पोषणाची चिंता त्याला आहे. तो आमचें रक्षण केल्यावांचून राहाणार नाहीं. मला माझ्या अन्नवस्त्राची चिंता करण्याचें कारण नाहीं. दयामय पिता माझी [ आणि माझ्या कुटुंबाची ] काळजी वाहाण्यास समर्थ आहे!

१६. आ०—तथास्तु! तर मग, परमेश्वरासमक्ष त्याच्या पवित्र ब्राह्मधर्माच्या प्रचारकाच्या दीक्षेचा स्वीकार करण्याविषयीं प्रतिज्ञा करा.

१७. दी०—आज, रोज * * *, महिना * * *, शके * * *, या दिवशीं मी परमेश्वरासमोर **ब्राह्मधर्मप्रचारकव्रताचा** स्वीकार करितों. आजपासून सर्व ऐहिक विवंचनांचा व संसारिक विषयांचा मी त्याग करितों. ब्राह्मधर्माचा प्रचार करणें, बंधुजनांची सेवा करणें, व पृथ्वीवर परमेश्वराचें ब्रह्मराज्य स्थापन करणें, इत्यादि धर्मकृत्यांमध्यें मी आपलें सर्व जीवन खर्च करीन. ह्या पवित्र आणि सनातन ब्राह्मधर्माचा उपदेश करण्याच्या कामीं मी कोणासही भिणार नाहीं. ह्या सत्य धर्माचें जें कांहीं उदार व गंभीर स्वरूप आहे तें कोणाचीही मर्जी संपादन करण्याकारितां बुद्ध्या जाणून बुजून अन्यथा भासविणार नाहीं. सत्य, प्रेम, पवित्रता,

ईश्वरभक्ति, आणि बंधुप्रीति इत्यादिकांचा [illegible]करून मनुष्यमात्रामध्यें प्रसार होईल अशा रीतीनें मी सर्वदा उपदेश करीन. या पवित्र नवविधानाचें गौरव करीन; त्याचा प्रसार करीन; त्याचें महत्व वाढवीन. सुवर्ण आणि रौप्य, संपत्ति आणि वैभव यांची परवा करणार नाहीं. तसेंच उदरभरणाची व्यर्थ चिंता वाहाणार नाहीं. ईश्वराविषयीं मनुष्यमात्राच्या ठायीं प्रेमभाव उत्पन्न करण्याविषयीं परिश्रम करणें याहून दुसरा कोणताही व्यवसाय मी करणार नाहीं. माझ्या संसाराची व्यवस्था पाहाणें व मला जें कांहीं लागेल तें पुरें पाडणें ह्या सर्व गोष्टी मी माझ्या समाजबांधवांवर सोंपवितों. ह्यांकडे त्यांनीं लक्ष्य पुरवावें. माझ्याप्रीत्यर्थ समाजास कर्ज होणार नाहीं, अशा रीतीनें शक्त्यनुसार मी शारिरिक व मानसिक परिश्रम करीन. परमेश्वरावर सर्व भरंवसा ठेवून मी अत्यंत नम्र आणि विरक्त राहीन !

परमसमर्थ परमेश्वर, तूं कृपालु होऊन आज या सुप्रसंगीं मला तुझ्या पवित्र धर्माची दीक्षा दिलीस. ह्या दीक्षेनुरूप वागण्याचें सामर्थ्य माझ्याठायीं उत्पन्न होईल, असा मंगल आशिर्वाद दे. मजमध्यें दृढ भाव, अचल विश्वास, व शुद्ध प्रेम हीं निर्माण कर—कीं ज्यां-

च्यायोगें तुझा सेवक ह्मणवून घेण्याची यत्किंचित तरी योग्यता मजमध्यें येईल ! तुझ्या पवित्र नामाचा सर्वदां जयजयकार होवो !

१८. आ०—विधानपति परम थोर परमेश्वर तुह्मांवर अनुग्रह करो, व तुह्मांस सर्व सामर्थ्य प्रदान करो !

१९. आचार्यांनीं असा आशिर्वाद दिल्यानंतर तेथें असलेल्या सर्व प्रचारकवर्गानें या नूतन प्रचारकास दृढ प्रेमालिंगन द्यावें व एक कमंडलू व वीणा यांची त्यास देणगी द्यावी.

२०. नंतर प्रसंगास अनुरूप असें एखादें संगीत ह्मणून सर्व समाजानें " ब्रह्मकृपाहि केवलं " " शांतिः शांतिः शांतिः " या वचनांचा उच्चार करावा.



# ब्राह्मधर्ममतें.

परमेश्वर एक आहे. तो अनादि, अनंत, सर्वज्ञ, सर्वशक्ति, निरवयव, ज्ञानस्वरूप, परमपवित्र, कल्याणनिधान, आनंदमय, पतितपावन असा आहे.

२. मनुष्यास आत्मा आहे. तो अमर, अविनाशी, आणि उन्नतस्वरूप आहे. परमेश्वराशीं त्याचा साक्षात व नित्य संबंध आहे.

३. परमेश्वराच्या ठायीं प्रीति, पूज्यत्वबुद्धि, आणिं अनन्यभाव ठेवून तत्पूर्वक त्याचें मानसिक भजनपूजन करणें हीच त्याची शुद्ध उपासना. हिच्याच योगें इहलोकीं व परलोकीं शाश्वत सुखप्राप्ति होते.

४. परमेश्वर सावयवरूपानें पृथ्वीवर अवतार घेत नाहीं. सर्वथा सत्य व सर्वांशीं प्रमाण असें कोणतेंही एक धर्मपुस्तक त्यानें दिलेलें नाहीं.

५. मनुष्याच्या अंतर्यामीं परमेश्वरानें आपल्या पवित्र धर्मबीजाची स्थापना करून ठेविली आहे. तद्द्वारां मनुष्यमात्रास सत्यधर्माचें ज्ञान होतें. हा धर्मभाव शुद्ध व सात्विक पुरुषांच्या ठायीं विशेष जागृत असतो.

६. परमेश्वर सकल मनुष्यमात्राची प्रेममयी माता. अतएव प्रत्येक पुरुष आपला बंधु व प्रत्येक स्त्री आपली भगिनी, असा मंगल भाव अंतःकरणांत सदैव जागृत ठेवून प्रत्येकानें वागावें.

७. मनुष्यास आपल्या पापपुण्याचा इहलोकीं व परलोकींही हिशेब द्यावा लागतो. पातकाबद्दल परमेश्वर दंड करितो तो मनुष्याच्या हितार्थ करितो. हा दंड अनंतकालचा नसतो.

८. कृत पातकांबद्दल अनुतप्त अंतःकरणानें परमेश्वरास शरण जाणें, त्याजवर आपला सर्व भरिभार टाकून पातकापासून सर्व प्रकारें दूर राहाण्याविषयीं निरंतर जागृत राहाणें, हेंच पापाचें खरें प्रायश्चित्त.

